मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ७७ वें.



# आश्रमहारिणी.

हें पुस्तक.

श्रीयुत **वामन मल्हार जोशी**, एम्. ए.,

यांनीं लिहिलें.



[ द्वितीयावृत्ति. ]



प्रकाशकः

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,**

**गिरगांव—मुंबई.**



किंमत ०-६-०. ]  [ जुलै १९१६.

# प्रास्ताविक शब्द.

मेढें तालुक्यांतील मोरगांव मुक्कामीं श्रीपाराशरपुराणाची एक जुनी पोथी सांपडली. आंतर व बाह्य पुराव्यावरून पाहतां या पोथींत सांपडणारे कांहीं श्लोक, कांहीं अध्याय, किंबहुना सर्वच पुराण प्रक्षिप्त दिसत आहे. अठरा पुराणांच्या यादींत 'पाराशर' पुराणाचें नांव नाहीं; मग हें उपलब्ध झालेलें 'पाराशर' पुराण कोठलें? पुराणांची यादी चुकलेली समजावयाची, का सांपडलेली पोथी प्रक्षिप्त समजावयाची? 'प्रक्षिप्तते'बद्दलच्या या किंचित् विक्षिप्त भासणाऱ्या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वी 'या पोथींत आहे तरी काय?' याचें ज्ञान वाचकांनां करून देणें आवश्यक आहे, हें उघड आहे. मूळ संस्कृत पोथीच छापली तर ती [illegible] जितका कागदाचा कपटा अधिक जुना तितका तो अधिक मौल्यवान् असें [illegible] व हाडांचीं काडें करून जुने कागदपत्र, जुन्या पोथ्या, जुनीं नाणीं वगैरेचें शोधन, मनन व परीक्षण करणाऱ्या इतिहाससंशोधकांशिवाय–कोणी वाचणार नाहीं, असें वाटल्यावरून या पोथींतील कांहीं मनोरंजक कथांचें प्रथम यथामति भाषान्तर करून विद्वज्जनांचें व सामान्यजनतेचेंहि लक्ष या पोथीकडे वळवावें, असा विचार केला आहे. भाषान्तर करतांना अर्थ स्पष्ट व सुबोध करण्याकडे विशेष लक्ष दिलें आहे. पोथीचीं पहिलीं पानें फाटलीं असल्यामुळें पहिले मंगलाचरणाचे श्लोक अर्धेमुर्धेच आहेत; ते अर्थात् या भाषान्तरांत गाळले आहेत. तसेंच कांहीं दुर्बोध श्लोकहि गाळले आहेत, हें प्रांजलपणें

## प्रास्ताविक शब्द.

कबूल करणें भाग आहे. मूळ पोथी पुढेंमागें छापण्याचा विचार आहे, किंबहुना ती छापावीच लागेल. असो.

पुणें, तांबे यांचा वाडा,
शनिवारपेठ, २० जुलै १९१५.

वामन मल्हार जोशी.

# आश्रमहरिणी.

## अध्याय पहिला.

### दुर्ललितशैशव.

श्रीगणेशाय नमः । श्रीपाराशर उवाच । ऋषींनों, तुह्मीं मला आतां जो प्रश्न केलात, तसाच प्रश्न पूर्वीं हिरण्यगर्भ नांवाच्या राजानें नारदमुनींस एकदां विचारला होता. 'या प्रश्नाचें उत्तर मागाहून देईन' असें राजास सांगून नारदमुनींनीं आपल्या मंत्रशक्तीनें एक विमान आणविलें व त्या पुण्यश्लोक राजास घेऊन ते अंतरिक्षांतून जाऊं लागले. पुराणकथा निवेदन करीत नारद विमानांत बसून चालले असतां त्यांनीं कांहीं वेळानें धौम्य ऋषींचा आश्रम पाहिला, व विमान खालीं उतरून ते आश्रमांत शिरले आणि महर्षींनां अभिवंदन करून कुशलप्रश्नपूर्वक कांहीं वेळ त्यांच्याशीं त्यांनीं प्रेमसंभाषण केलें. नंतर चतुर उपोद्घात करून आपल्या मनांतील स्त्रीधर्मविषयक प्रश्न त्यांनीं महर्षींनां सादरविनयपूर्वक विचारला. धौम्य ऋषींनीं तो प्रश्न ऐकून डोळे मिटून क्षणभर ध्यान केलें व नंतर लांब व दीर्घ उसासा टाकून अति गंभीर परंतु जरा उदास स्वरानें ह्मटलें 'नारदा, तूं तर त्रिकालज्ञानी आहेस. तुला सर्व धर्मशास्त्र विदित आहे. तेव्हां तुला मी कांहीं नवीन सांगणार आहें असें नाहीं; परंतु तुझ्याबरोबर असलेल्या या अतुलप्रताप पुण्यशील हिरण्यगर्भ राजाला मी आपली स्वतःची गोष्ट सांगतों, व ती या राजानें श्रवण केल्यानंतर आपण या विषयाचा सांगोपांग ऊहापोह करूं' असें ह्मणून महर्षींनीं आपली कथा सांगण्यास प्रारंभ केला.

"हिरण्यगर्भराजा, माझी चरित्रकथा फारच बोधप्रद आहे. माझे मातापिता चांगल्या ब्राह्मणकुळांतले असून गुरूपदेशाप्रमाणें व धर्मशास्त्राप्रमाणें गृहस्थाश्रमांत राहून पुण्य संपादीत होते. आह्मी अग्निरथ राजाच्या अवन्तिका नगरींत रहात होतों. मला नववें वर्ष लागल्यावर माझ्या पित्यानें मला पूर्णप्रज्ञ ऋषींच्या आश्रमांत पाठविलें. आश्रमांत पाठवितांना माझ्या पित्याला किंवा मातेला किती दुःख झालें असेल, याचें मी वर्णन करीत नाहीं. एवढेंच सांगतों कीं, पूर्णप्रज्ञ ऋषींच्या स्वाधीन करून आश्रमांतून परत जातांना माझ्या पित्यांनीं गुरूंची आज्ञा पाळण्यासंबंधानें वगैरे जेव्हां उपदेश केला व 'तूं काळजी करूं नको; चातुर्मासांत तुला घरीं न्यावयास मी येईन,' असें ते बोलूं लागले, तेव्हां त्यांचा त्या वेळीं कंठ दाटून आला व त्यांनीं आपलें प्रेमार्द्र हृद्गत अश्रुमय नयनांनींच व्यक्त केलें, व अधिक न बोलतां शोकावेग आवरून व हृदय कठोर करून ते मला सोडून गेले! दूर गेल्यावर मला त्यांनीं आश्रमांत नव्हे तर अरण्यांतच टाकून दिलें आहे, असें मला वाटूं लागलें, व कांहीं दिवस मला आपल्या मातेची व कनिष्ठ बंधुभगिनींची आठवण येऊन मी एकान्तांत रडत बसत असें. त्या अवाढव्य आश्रमांत आमच्या नगरींतील गभस्तिगतीशिवाय माझ्या ओळखीचा असा दुसरा कोणी मुलगा नव्हता; परंतु आमच्या दोघांचे स्वभाव भिन्न असल्यामुळें मला तो सुद्धां अगदीं परक्यासारखा वाटे, व मला आश्रमांत कांहीं दिवस मुळींच चैन पडत नसे. परंतु कालान्तरानें तेथील समवयस्क छात्रांशीं माझा स्नेह जमला व गुरुजींच्या प्रेमळ अध्यापनामुळें अध्ययनाचीहि मला आवड वाटूं लागली. आपल्या संवगड्यांबरोबर खेळण्यांत व गुरूपदेशाप्रमाणें अध्ययन करण्यांत

मी पुढें इतका गुंग झालों कीं मला मग घरची फारशी आठवण होईनाशी झाली, व आमचा आश्रम हा 'आमचा' आहे अशी भावना उत्पन्न होऊन 'आमच्या' आश्रमाची मला केवळ आवडच नाहीं तर त्याचा अभिमानहि वाटूं लागला. अनध्यायाचे दिवशीं आह्मी किती खेळ खेळलों; आश्रमाजवळच्या झाडींतून किंवा डोंगरावरून किती हिंडलों; जवळच्या गंगातुल्य पवित्र 'सरला' नदीवर आह्मी किती पोहलों; इत्यादि गोष्टींची नारदा, आठवण झाली ह्मणजे अद्यापिहि तें रम्य बालपण पुनः यावें अशी इच्छा होते! त्या वेळचे माझे मित्र माझ्याप्रमाणेंच आतां वृद्ध झाले आहेत व बहुतेकजण मान्य व पूज्य तपस्वी झाले आहेत; परंतु आह्मी कधीं एकत्र जमलों ह्मणजे आमचें गांभीर्य व मौन लयास जाऊन बरेच दिवस दाबलेल्या आमच्या मनोवृत्ति एकदम उचंबळून येतात व आह्मी लहान मुलांप्रमाणें विनोदकलकल करूं लागतों. आह्मीं कोणतीं साहसकर्में केलीं, मंदबुद्धि छात्रांची कशी चेष्टा केली, आमच्या विविध दुर्ललितांबद्दल गुरुजींनीं कसें शासन केलें इत्यादि गोष्टींचें या भेटीच्या वेळीं स्मरण होऊन आह्मांस अवर्णनीय आनंद होतो. फार काय सांगावें, त्या वेळच्या भांडणांचें, शत्रुत्वाचें व दुःखाचेंहि स्मरण आम्हांला विलक्षण आनंद देतें!

नारदा, माझ्या या वृद्ध वयांत आतां माझ्यामध्यें क्षुद्र अभिमानाचा लवलेशहि राहिलेला नाहीं हें तूं जाणत आहेस. तेव्हां, इतर छात्रांहून मी बुद्धिमान् होतों हें तुला सांगण्यास हरकत नाहीं. मी बुद्धिमान् होतों, इतकेंच नव्हे तर माझ्यामध्यें एक प्रकारचें धाडस होतें व सर्व प्रकारच्या क्रीडनांत मी फार वाकबगार असल्यामुळें माझ्या बरोबरीच्या मुलांचा मी मोठा आवडता नायक होतों. आश्रमांतील सर्व आचार्यांचीच नव्हे तर पूर्णप्रज्ञ कुलपतींचीहि माझ्यावर मोठी प्रीति होती. पूर्ण-

प्रज्ञ ऋषि आपलें प्रेम शब्दानें फारसें व्यक्त करीत नसत. त्यांची मला प्रथम फारच भीति वाटावयाची. त्यांच्या पावित्र्यतेजोयुक्त उग्र मुद्रेनेंच माझ्या उच्छृंखलपणाचें नियमन होत असे, व ते एक शब्द जरी मला रागानें बोलले तरी तो शब्द ऐकून मी भयाभीत होत असें; इतकेंच नाहीं तर 'मी फार वाईट आहें' असें वाटून माझी मला लाज वाटत असे.

आमच्या बरोबर आमच्या नगरींतलाच गभस्तिगति नांवाचा एक बुद्धीमान् छात्र होता, हें मीं क्षणापूर्वीं सांगितलेंच. याचा व माझा स्वभाव एकमेकांच्या अगदीं उलट. तो खेळण्यांत माझ्यासारखा पटाईत नव्हता व वर्तनांतील बालिश उच्छृंखलपणा किंवा दुर्ललितत्व त्याला मुळींच आवडत नसे. क्रीडनविनोदादि गोष्टींपेक्षां अध्ययनाकडे त्याचें अधिक लक्ष होतें. गभस्तिमान् सूर्य एक वेळ उगवण्यास चुकेल, पण आमच्या गभस्तिगतीचें प्रातरुत्थान व प्रातःस्नान कधींहि चुकावयाचें नाहीं, अशी त्याची कीर्ति होती. गुरूंचें अध्ययन चाललें असतां कोलाहल करणें किंवा पाठाकडे दुर्लक्ष करणें, अध्ययन संपल्यावर इतर छात्रांशीं विनोदयुद्ध करणें, गुरुजींच्या स्वराचा वगैरे अनुवाद करून त्यांची नक्कल करणें, इत्यादि गोष्टी त्याला आवडत नसत. अनध्यायदिन आह्मांला फार प्रिय; पण हा गभस्तिगति त्या दिवशींहि गुरुजींच्या नकळत अध्ययन करीत बसावयाचा. या स्वभावविरोधामुळें आह्मी एका नगरींतले असून त्याचें व माझें सख्य जमलें नाहीं, व पुढें कांहीं वर्षांनीं तर आमच्यामध्यें थोडेंसें वितुष्ट आलें.

हें वितुष्ट येण्याचें कारण क्षुल्लक होतें. राजा अग्निमित्र हा मृगया करीत करीत आमच्या आश्रमापाशीं आला आहे, अशी आह्मां छात्रांनां एक दिवस बातमी लागली व त्या राजाबरोबर

अनेक गवई, अनेक नट, दोन विदूषक व कांहीं युवतीहि आहेत, असें आह्मांला कळलें. आह्मी त्या वेळीं अकराबारा वर्षांचे होतों. त्या वयांत आह्मांला कामवासना कसली आली आहे? पुराणग्रंथांत अप्सरांनीं आपल्या सौंदर्यानें मोठ्या मोठ्या तपस्व्यांनां कसें मोहित केलें याचेंच त्या वेळीं आह्मांला आश्चर्य वाटत होतें! राजाच्या युवती पाहण्यापेक्षां त्याचे दोन नकली विदूषक पाहण्याचीच आह्मांला त्या वयांत अधिक इच्छा होती. पण आमच्याहून वयानें मोठे असलेल्या छात्रांच्या तोंडून राजाजवळच्या युवतींची कीर्ति ऐकून स्त्रीसौंदर्य इतकें मोहक व उन्मादकारक कसें व कां असतें, हें जाणण्याची आह्मांला फार प्रबल इच्छा होती....× अग्निमित्र राजाचेंहि दर्शन घेण्यास व त्याच्या पदरच्या गुणी लोकांचें गायनवादन ऐकण्यास आह्मी फार उत्सुक होतों. या राजाच्या आगमनाची वार्ता ऐकल्यापासून अध्ययनाकडे आमचें लक्ष लागेना. त्याला, त्याच्या युवतींनां, व त्याच्या विदूषकांनां केव्हां पाहतों, असें आह्मांला होऊन गेलें होतें. राजा अग्निमित्र दुसऱ्या दिवशीं आश्रम पाहण्यास येणार असून तो दिवस 'शिष्टागमनात् अनध्याया'चा आहे असें आह्मांस कळलें होतें; परंतु दुसऱ्या दिवसापर्यंत धीर कोणाला आहे? अग्निमित्र राजा आश्रम पाहण्यास आल्यास त्याला आश्रम दिसेल; पण आह्मांला त्याचा थाटमाट व त्याचा लवाजमा, आणि त्याच्या विदूषकांच्या नकला आणि त्यांचा विलक्षण पोषाख, इत्यादि गोष्टी कशा पाहण्यास सांपडणार? आश्रम पाहून राजा आश्रमाजवळून निघून गेल्यावर अनध्यायदिनाचा आह्मांला काय उपयोग? कुलपतींनां प्रिय असलेल्या प्रिय गभस्तिगतीला मध्यस्थ करून राजपरिवारदर्शनाची आमची इच्छा आह्मीं त्यांनां कळवली; परंतु त्यांनीं

× येथील श्लोक ग्राम्य दिसतो व तो पुरा लागलाहि नाहीं ह्मणून गाळला आहे.

‘ सूर्यास्तापूर्वी पांचसहा घटका अध्ययन बंद होईल व एक आचार्य इच्छा असेल त्यास राजशिबिराकडे तुह्मांला घेऊन जातील ’ असें त्याला सांगितलें; परंतु संध्याकाळपर्यंत तरी धीर कोण धरणार? शिवाय, हे आचार्य फार कडक व तिरसट होते. त्यांच्याबरोबर वनश्री पाहण्यास गेल्यानें आह्मांस कधींहि सुख झालें नव्हतें; हे कडक तिरसिंगराव आम्हांला राजयुवती दाखवितील, किंवा विदूषकांची आह्मांला कुरापत काढूं देतील, किंवा त्यांच्याकडे पाहून नाक खाजवूं देतील अशी आह्मांस आशा नव्हती. तेव्हां आह्मी चारपांच मंडळींनीं वृक्षवाटिकेंतून चोरून जाऊन राजपरिवाराची मौज पाहण्याचें ठरविलें.

मध्यान्हकालानंतर दोनएक घटकांनीं आह्मी एका गुरूकडे जाऊन काव्यग्रंथाचें अध्ययन करीत होतों व नंतर जरत्कारु नांवाच्या एका गुरूकडे जाऊन वेद व व्याकरणसूत्रें शिकत होतों. हे दुसरे गुरु अतिवृद्ध व अंध झालेले असून मुलांनां प्रश्न वगैरे विशेष विचारीत नसत. मुलांनां सूत्रांची वगैरे संथा द्यावयाची आणि नंतर त्यांचें विवरण करावयाचें, असा त्यांचा क्रम असे. एकाद्या मुलानें या वेळीं जर कांहीं शंका विचारली तरच त्याचें त्यांनां अस्तित्व कळावयाचें. गभस्तिगति, मी, चंद्रकान्त, शशपाद इत्यादि सात आठ मुलांखेरीज कोणी त्यांनां शंका विचारीत नसे. शशपाद, मृगप्लुत, वेतसांग व मी पाठ चालला असतां बहुधा खेळतच असूं; परंतु हें त्यांनां कळत नसे. आमच्या हंसण्यानें वगैरे त्यांनां आमचा संशय आलाच तर ते आह्मांस एकादा प्रश्न विचारीत, व खरोखरीच दुर्लक्ष आहे कीं काय याबद्दल आपली खात्री करून घेत. परंतु आह्मीं आपल्या चातुर्यानें त्या प्रश्नाचें कसें तरी उत्तर देऊन पाठाकडे आमचें लक्ष होतें, असें त्यांनां भासवीत होतों. मीं त्यांनां अनेक वेळां मार्मिक शंका विचारल्या

असल्यामुळें व त्यांच्या कठीण प्रश्नाचें बरोबर उत्तर देऊन त्यांचें अनेक वेळां समाधान केलें असल्यामुळें त्यांची माझ्या बुद्धिमत्तेबद्दल खात्री झालेली होती, व त्यांनां जरी माझा उनाड व चावट स्वभाव ठाऊक होता, तरी त्यांचें माझ्यावर प्रेम होतें. माझा उनाडपणा व [illegible] हें सर्व माझें बाह्यस्वरूप आहे हें त्यांनीं ओळखलें होतें, व माझे अंतःकरण कोमल आहे आणि मला अध्ययनाची खरोखर आवड आहे, अशी त्यांची खात्री झाली होती. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, मी जरी त्यांनां एकादे वेळेस अज्ञानाचें पांघरूण घेऊन हंशा पिकविणाऱ्या विनोदी शंका विचारीत असें, तरी त्यांचें खरें प्रेम सरलस्वभाव गभस्तिगतीपेक्षां माझ्या-वरच अधिक होतें! परंतु बाह्यतः मात्र ते माझी बहुधा निंदा करीत असत व एकादे वेळेस रागाचा अविर्भाव आणून 'शूद्रोऽसि किम्' '[illegible] किम्' इत्यादि कोपसूचक प्रश्न विचारीत असत व 'मूढ' 'बर्बर' 'शूद्र' इत्यादि अपशब्द बोलून माझा उच्छृंखलपणा गर्हणीय आहे, असें भासवीत असत.

या अंधगुरुजींनां फसवून राजपरिवार पहावयास जाण्याचें शशपाद, मृगप्लुत, मीं व चन्द्रकान्त यांनीं ठरविलें. त्या दिवशीं ते दोन घटका वेदाची संथा देणार होते, व नंतर व्याकरणसूत्रांचें विवरण करणार होते हें आह्मांला ठाऊक होतें. पंचवीसतीस छात्रांच्या आवाजांत आह्मी चारपांच मुलें संथा घेत आहों किंवा नाहीं, हें त्यांनां कळणें शक्य नव्हतें.

'पण व्याकरणसूत्रांच्या वेळेस तुझी आठवण 'दिवांधां'नां (गुरु-जींचें टोपणनांव) व्हावयाचीच!' शशपाद मला ह्मणाला. 'त्या वेळेस तुझ्याशिवाय आणि गभस्तिगतीशिवाय कोण शंका विचारणार? अरे,

तूं पाठाला आला नाहींस ह्मणजे आह्मांलाहि तो अध्ययनकाल फार कंटाळवाणा जातो. तूं हजर नाहींस हें दिवान्धगुरूंनां सुद्धां ओळखेल.'

हें त्याचें ह्मणणें खरें होतें. आतां काय करावयाचें? मृगप्लुत ह्मणाला 'याला एक युक्ति आहे. आपल्या वेतसांगाला तुझा, माझा—सगळयांचाच आवाज बरोबर काढतां येतो. गुरुजींनां आपली कोणाची आठवण झाली तर त्याच्यासारखा स्वर काढून त्यानें गुरूजींनां एकादी शंका विचारली ह्मणजे तो हजर आहे, असें त्यांनां वाटेल.'

या गोष्टीला प्रथम वेतसांग कबूल होईना; परंतु मीं त्याला जेव्हां आग्रह केला तेव्हां तो कबूल झाला. त्याचें माझ्यावर प्रेम होतें. मी त्याच्या नकली गोष्टींचा, विनोदाचा व चेष्टांचा मोठा भोक्ता होतों, व माझ्या बुद्धीबद्दल त्याला आदर वाटत असे. त्याच्याशीं विनोद करण्यास जसा मी तयार होतों, तसा त्याला अध्ययनांतहि मी साहाय्य करीत असें. माझा स्वभाव मनमिळाऊ होता व मीं गभस्तिगतीसारखा बुद्धिमान् असूनहि त्या मंदबुद्धि मुलाशीं मिळूनमिसळून वागत असें. गभस्तिगतीला छात्रांचे चाळे आवडावयाचे नाहींत. पण मी मतिमंद छात्रांशीं थट्टामस्करी करून त्यांच्यामध्यें असलेल्या निरनिराळया गुणांची प्रशंसा करीत असें. या वेतसांगाला सर्व लोक मंदबुद्धि समजावयाचे व तो लंगडा होता ह्मणून त्याला चिडवावयाचे. पण अध्ययनांत जरी मंद असला तरी तो चित्रें काढण्यांत, नकला करण्यांत वगैरे फार कुशल होता. त्याचा लंगडेपणा हें त्याचें बाह्यांग होतें हें मी, शशपाद, वगैरे चारपांच मंडळीच ओळखून होतों, व आमच्यामध्यें फार दाट सख्य होतें. आह्मीं सांगितलेली गोष्ट करण्याचें प्रथम जरी त्यानें नाकारलें, तरी मीं 'मित्र उपयोगी पडत नाहीं, तर त्याचा उपयोग काय?' असें जेव्हां त्याला ह्मटलें तेव्हां या वेळीं आह्मांला मदत न करणें ह्मणजे

कृतघ्नपणा आहे असें त्याला वाटलें, व तो आमच्या सांगण्याप्रमाणें करण्यास तयार झाला.

' पण गभस्तिगती चहाडी सांगेल ! ' पुनः त्यानें शंका काढली. ' ते धर्माचे अवतार आहेत, त्यांनां हें नाहीं पसंत पडायचें. ' उपरोधिक स्वरानें तो आणखी ह्मणाला.

' छेः, तो चहाडी सांगण्याइतका नीच नाहीं,' मीं ह्मटलें. 'तो आपल्या युक्तींत सामील व्हावयाचा नाहीं; पण आपण होऊन चहाडी सांगायचाहि नाहीं,' असें मीं ह्मटल्यावर वेतसांगाचें समाधान झालें.

' पण दिवान्धांची ती सुलोचना पोरगी आहेना, ती पोर आपल्या बापाला सांगेल. ' शशपादानें दुसरी एक शंका काढली. सुलोचना ही जरत्कारु गुरूंची एकुलती एक नात होती. *आह्मी जरत्कारु गुरूंच्या उटजांतच अध्ययनाला जात होतों आणि तेथें ही सुलोचना असावयाचीच. कधींकधीं ती आपल्या पितामहाच्या जवळ येऊन बसावयाची व एकादवेळेस तर आमच्याबरोबर संथाहि [illegible]. आमची संथा [illegible] कांहीं ऋचा व कांहीं सूत्रे तिचीं पाठहि झालीं होतीं. ही तेथें असली आणि वेतसांग जर माझ्यासारखा स्वर काढून रडूं लागला, तर तिला अनावर हंसूंहि येईल, व आपल्या वृद्ध पितामहाची चाललेली मस्करी तिला खपणार नाहीं, आणि ती अर्थातच त्यांनां ही गोष्ट सांगेल, अशी

---

* येथें बालसुलोचनेच्या सुंदर लोचनांचें व इतर अवयवांचें नेहमींच्या पद्धतीचें लांबलचक जें मुळांत वर्णन आहे, तें गाळलें आहे. त्याच्यांत एकदोन गोष्टी मात्र ध्यानांत ठेवण्याजोग्या आहेत. 'कमलासारखे मुख,' 'हरिणीसारखे डोळे,' इत्यादि ठराविक उपमा आहेतच; पण एका श्लोकांत ' ती हरिणीसारखी उड्या मारीत असे, ' तर दुसऱ्या एका श्लोकांत त्या कोमल बालिकेला 'बाललता ' ठरवून तिच्या वस्त्राचे ' सुवर्णमय ' ( जराचे ? ) कांठ ' लतेभोंवतीं नागमोडी वळसा घालीत गेलेल्या लतेप्रमाणें भासत असत ' असें ह्मटलें आहे.

आह्मांला भीति पडली, व धाडस करण्याची आमची कोणाची छाती होईना. इतक्यांत आमचा दुसरा एक सोबती तेथें आला. त्याला आमचा बेत व आमची अडचण कळविल्यावर तो ह्मणाला ‘ सुलोचनेची तुह्मांला काळजी नको. ती आज अरुंधतीमातेकडे राहण्यास गेली आहे.’ ‘बायकांचें आज कांहीं तरी व्रत असावें.’ शशपाद ह्मणाला ‘अदितिमाता व तिच्या मुली अरुन्धतीमातेकडे जातांना मला दिसल्या खऱ्या.’

ही बातमी कळल्यावर सुलोचनेची भीति निराधार ठरून आह्मीं आपला बेत सिद्धीस नेण्याचें ठरविलें. आतां कांहींच अडचण उरली नव्हती. पण आमच्यांतील ‘मृगप्लुत’ ह्मणाला ‘ दिवान्धगुरूनां आपली लुच्चेगिरी अंतर्ज्ञानानें कळली तर ?’

‘ गभस्तिगतीचे हे दुसरे बंधूच आहेत ! ’ असें ह्मणून शशपाद त्याच्या भीरुत्वाची चेष्टा करूं लागला व नारदा, मीहि त्या वेळेस इतका मूढ झालों होतों कीं, मीसुद्धां त्याच्या भीरुत्वाची टर उडविली. तरी मृगलुप्ताची भीति जाईना व अखेर त्यानें आमच्याबरोबर येण्याचें नाकारलें; परंतु आह्मीं त्याची विशेष पर्वा केली नाहीं. काव्यग्रंथाचा कसाबसा पाठ घेतल्यानंतर दिवान्धगुरूंकडे न जातां ठरलेल्या वेळीं झाडींतून लपतछपत जाऊन नृपपरिवार, नृपवैभव वगैरे आह्मीं पाहून तर घेतलें. राजाचे विदूषक मात्र आह्मांला कोठे दिसले नाहींत. राजयुवती पाहून सुद्धां ‘ या बायका तपस्व्यांनां कशा वश करतात ’ ही आमची शंका नष्ट झाली नाहीं ! ‘या सुंदर असल्या ह्मणून त्यांचें आपण कां ऐकावें !’ असें शशपाद जोरानें ह्मणाला. आह्मांला खरा *आनंद राजाच्या गवयांनीं दिला. आमच्या आचार्यांच्या वेदपठनांत एक प्रकारचें माधुर्य व पावित्र्य होतें; पण या राजगायकांचें गाणें आह्मांला त्याहूनहि

फारच श्रुतिमनोहर वाटलें. असो. आह्मी राजशिबिराभोंवतीं दोनतीन घटका हिंडलों व नंतर पुनः चोरासारखे आश्रमांत शिरलों.

इकडे रोजच्या वेळेवर जरत्कारु अंधगुरूंनीं सर्व छात्रवर्गाला संथा देण्याचें काम सुरू केलें व नंतर ते व्याकरणशास्त्राचें विवरण करूं लागले. नेहमींचें माझें हसणें किंवा माझे विनोदी प्रश्न वगैरे कांहीं न ऐकल्यामुळें त्यांनां चुकल्यासारखें होऊनच कीं काय त्यांनीं 'बाळ धौम्य, तुला अर्थ चांगला कळला आहेना?' असें विचारलें. मी तेथें नसल्यामुळें याला कोण उत्तर देणार? गभस्तिगतीला माझें चौर्य-पलायन ठाऊक होतें, पण त्याचें व माझें विशेष सख्य जरी नव्हतें, तरी आपण होऊन चहाडी करण्याइतका तो नीच (?) नव्हता. 'धौम्य, आज तूं बोलत कां नाहींस?' असें गुरुजींनीं विचारलें. आमच्या वेतसांगाला आतां काय करावें हें सुचेना. गुरु मोठ्या प्रेमानें हांका मारूं लागले व त्यांनां कोणीच उत्तर देईना. असें कांहीं पळें चालल्यावर आमच्या वेतसांगाला कोठली कुबुद्धि सुचली कोणास ठाऊक, तो आपला माझ्या हुंदक्याची नक्कल करून रडूं लागला. बिचाऱ्या त्या अंध गुरूनां वाटलें कीं, मीच रडत आहें व ते 'बाळा धौम्या, कां रडतोस?' 'धौम्य, बोलत कां नाहींस?' असें प्रेमानें विचारूं लागले, व मला आपल्याजवळ बोलवूं लागले. वेतसांग अर्थात् जवळ गेला नाहीं. माझ्या दुःखाचें कांहीं तरी मोठें कारण असेल असें त्या प्रेमार्द्र भोळ्या गुरुजींनां वाटून त्यांनीं शशपाद, शुकस्वर इत्यादि माझ्या मित्रांनां माझ्या शोकाचें कारण विचारलें; पण ते बोलताहेत कशाला? दुसरा कोणीहि खरी गोष्ट गुरूजींजवळ सांगेना. शेवटीं त्यांनीं माझें नांव उच्चारून आपल्याजवळ येण्यास मला आज्ञा केली. आतां मात्र वेतसांगाला फार पंचाईत पडली. पण शेवटीं धीर धरून

व धाडस करून तो त्यांच्याजवळ गेला व मधुनमधून हुंदके देत मुळुमुळु रडूं लागला. गुरुजींनीं त्याच्या तोंडावरून हात फिरविला व 'कां रडतोस, कोणीं बोललें कीं काय?' असे प्रेमळ प्रश्न ते कोमलस्वरानें विचारूं लागले. या प्रश्नांनीं वेतसांगाला अधिकच रडूं कोसळलें. त्या लुच्चाला गुरुजींचें हंसूंच येत होतें, पण त्यानें प्रसंग पाहून तें कसेंबसें दाबून अधिकच स्फुंदनात्मक शोक करण्यास आरंभ केला! ह्याच्या स्फुंदनानें व रोदनानें जरत्कारु गुरूंचें मन अगदीं गहिंवरून गेलें व माझा शोक पाहून 'अशा वेळीं उपदेश करण्यांत विशेष फायदा नाहीं' असा त्यांनीं आपल्या मनाशीं विचार केला व माझें सोंग घेणाऱ्या वेतसांगाला आपल्या आसनावर जाऊन बसण्यास त्यांनीं सांगितलें.

अशा रीतीनें ती वेळ तर निर्विघ्नपणें पार पडली; परंतु ही नक्कल आश्रमांत सर्वतोमुखीं झाली व अखेर ती कुलपतींच्या कानावर गेली. त्यांनीं मला बोलावून नेलें व काय हकीकत आहे, ह्मणून मला विचारलें. कुलपतींनां फसविणें योग्य नाहीं, असें वाटून सर्व खरीखरी हकीकत त्यांनां सांगून टाकावी,असें मला एकदां वाटलें;परंतु खरी गोष्ट कबूल केल्यास प्रियमित्र नेत्रांगाला तोंडघशीं पाडल्यासारखें होईल, असें वाटून 'हें सर्व कुभांड आहे, दुसरे लोक माझे वैरी आहेत, ते सर्व खोटें बोलत आहेत—अमुक अमुक कारणानें ते माझे वैरी झाले आहेत'—इत्यादि इत्यादि खोट्या गोष्टी कुलपतींनां मीं सांगितल्या. त्रिकालज्ञानी ते! त्यांनां काय खरी गोष्ट ठाऊक नव्हती? पण न्यायाचा व्यवहारमार्ग दाखवण्याकरितां त्यांनीं गभस्तिगतीला बोलावून आणून माझ्यासमोर त्याला 'खरा प्रकार काय आहे?' असें विचारलें. गभस्तिगतीनें अर्थात्च सर्व खरी हकीकत सांगितली व मींहि लगेच सर्व अपराध कबूल करून 'पुनः असें करणार नाहीं' असें करुण-

स्वरानें ह्मटलें. कुलपति आतां मला फारच शासन करतील,अशी मला भीति पडली व मी थरथर कांपूं लागलों; परंतु या असल्या असत्य भाषणाबद्दल प्रायश्चित्त ह्मणून मला, वेतसांगाला व माझ्या इतर सोबत्यांनां तीन दिवस उपोषण करण्यास त्यांनीं सांगितलें, व माझ्याकडे सरोष पण प्रेमगर्भ नयनांनीं पाहून 'जात धौम्य, अनार्यगर्हितमिदं असत्य-भाषणं' (अनार्य मनुष्यच असत्यभाषणी असतो) असे शब्द उच्चारले, व 'न त्वत्सदृशमिदं' (हें तुला तर शोभत नाहीं) असें ते 'त्वत्सदृश' या शब्दावर जोर देऊन ह्मणाले. त्यांचे शब्द त्या वेळीं मला किती लागले असतील याची, हिरण्यगर्भराजा, तूंच आपल्या मनाशीं कल्पना कर. मला माझ्या कृत्याची लाज वाटली खरी, पण गभस्तिगतीनें ही गोष्ट कुलपतींजवळ सांगितल्यामुळें त्यांनां ती खरी वाटली, असा आमचा पोरवयांतला तर्क होऊन सत्य बोलण्याच्या त्याच्या अघोर पापाबद्दल त्याच्यामध्यें व आमच्यामध्यें वैमनस्य आलें!

नारदा, त्याच्या चांगुलपणाबद्दलच त्याचा आह्मी द्वेष करूं लागलों, हें केवढें आश्चर्य! पण त्या वेळीं आह्मांला आमच्या कृत्यांत फारसा दोष दिसला नाहीं. गभस्तिगतीला मैत्रीची चाड नाहीं, तो अहंमन्य आहे, तो धार्मिकतेचा व सत्यभाषणाचा उगाच दंभ करतो, इत्यादि दोष आह्मांला त्याच्यांत दिसूं लागले. तो अभ्यासी असला तरी त्याच्यांत माझ्यासारखें बुद्धितेज नाहीं, तो घोकंपट्टी करणारा आहे, त्याच्यामध्यें माझ्यासारखी मार्मिकता नाहीं, त्याला काव्यमर्म कळत नाहीं, त्याच्यामध्यें काव्यस्फूर्ति नाहीं, अशा प्रकारची आमच्या दोघांमध्यें माझ्या मित्रांनीं तुलना केली व त्यांचें ह्मणणें मला अर्थात्च रुचलें. परंतु रागाचा झपाटा गेल्यानंतर माझी चूक मला दिसून आली. मी त्याचा उगाच द्वेष करीत आहें, असें मला कळूं लागलें. माझ्या

असत्य भाषणाची माझी मलाच लाज वाटूं लागली व गुरुजींनां तोंड दाखवूं नये असें मला वाटूं लागलें. कुलपतींच्या समोर उभें राहण्याचीहि मला शरम होऊन त्यांच्याकडे जाणें नको व त्यांचें दर्शन नको असें मला होऊं लागलें. आपल्या बुद्धीची जशी आश्रमांत कीर्ति आहे, तशी आपल्या चारित्र्याचीहि [illegible], असा मीं निश्चय केला, व पांचसहा महिन्यांतच आपल्या सद्वर्तनानें कुलपतींशिवाय बहुतेक सर्व गुरूंचें प्रेम पुनः संपादन केलें. माझा उच्छृंखलपणा गेलेला पाहून त्यांनां किती आनंद झाला ह्मणून सांगूं ! माझें पापी मन मला खात होतें; पण गुरुजींच्या पोटांत—मातेसारख्या प्रेममय, क्षमाशील व उदार पोटांत—माझ्या दुष्कृत्याबद्दल आतां कांहीं रोष किंवा द्वेष राहिला नव्हता. कुलपतींची मात्र मला खात्री होईना. त्यांच्या गंभीर—किंबहुना उग्र—मुद्रेकडे पाहिलें ह्मणजे माझ्या पापाची मला आठवण होऊन त्यांच्याशीं बोलण्याची मला किती दिवस तरी भीति वाटावयाची. त्यांचें प्रेम संपादन होईल तेव्हांच आपलें आचरण सुधारलें असें समजावयाचें, अशी मनाशीं गांठ घालून अध्ययनादि दिनक्रमांत मीं कधींहि नियमातिक्रम केला नाहीं. कांहीं दिवसांनीं मला पूर्ण पश्चात्ताप होऊन गभस्तिगतीजवळ मी गेलों, मन मोकळें करून रडलों व त्याची क्षमा मागितली ! शशपाद, वेतसांग इत्यादि मित्रांनांहि योग्य उपदेश करून गभस्तिगतीविषयींचा द्वेष सोडण्यास मीं सांगितलें. नारदा, बालपणचें वैर काय किंवा सख्य काय तात्पुरतेंच असतें असें ह्मणतात, तें खरें आहे. गभस्तिगतीचें व माझें वैर फार दिवस टिकलें नाहीं. पण त्यानंतर त्याचा व आमचा जो स्नेह जमला त्यामध्यें मात्र कधीं भंग पडला नाहीं. तो व मी यापुढें एकत्र अध्ययन करूं लागलों. त्याचें अध्ययनशीलत्व, त्याचा दृढ निश्चय व त्याची पावित्र्यप्रीति मीं उचलली. त्याचेंहि माझ्या

संगतीपासून हित झालें. मी त्याला अनेक क्रीडांमध्यें खेंचून ओढून नेत असें. गुरुजींनीं दिलेला अभ्यास झाला ह्मणजे त्याला मी जिकडे नेईन तिकडे तो येत असे. त्याची मीं थट्टामस्करी केली किंवा त्याच्याशीं दंगामस्ती केली तरी तो रागवत नसे. खरी गोष्ट अशी होती कीं तो फारच भोळा, साधा मनुष्य होता. गुरुजींनीं दिलेला अभ्यास संपेपर्यंत तो माझी गडबड चालूं द्यावयाचा नाहीं; परंतु नंतर तो अगदीं माझ्या ताब्यांत असावयाचा. अभ्यास करीत असतांना त्रास देऊं पाहणाऱ्या इतर छात्रांनां तो दाबीत असे, पण माझ्याविषयीं त्याला इतकें प्रेम वाटत होतें व इतका आदर होता कीं, मीं त्याच्या अभ्यासाच्या वेळीं जरी त्याला त्रास दिला तरी तो सर्व मुकाट्यानें सोसून घेत असे. ‘ तुझ्या क्रीडनशील संगतीमुळें मी अधिक निरोगी, उत्साही व आनंदयुक्त झालों आहें, ’ असें तो मला ह्मणत असे. असो.

इति श्रीपाराशरपुराणे दुर्ललितशैशवं नाम प्रथमोऽध्यायः समाप्तः ।

शुभं भवतु ॥

# अध्याय दुसरा.

## बालतपोनिश्चय.

श्रीगणेशाय नमः। धौम्य म्हणाले ' हिरण्यगर्भराजा, गभस्तिगतीशीं जरी माझें पूर्ण सख्य जमलें तरी कुलपतींचा अजून माझ्यावर रोष आहे कीं काय, याची खात्री नसल्यामुळें माझें मन प्रसन्न नव्हतें; परंतु त्यांचें मन मला कळणार कसें ? त्यांच्यापुढें जाऊन बोलण्याची मला आतां छाती नव्हती; तेव्हां त्यांचा रोष अद्यापि कायम आहे किंवा कसें, हें मला कळेना. *

एके दिवशीं आमचा आश्रम पाहण्यास चण्डप्रभऋषि आले होते. राजा हिरण्यगर्भा, हे ऋषि फार विनोदप्रिय होते, हें तुला ठाऊक असेलच. यथाविधि त्यांचें अर्चन झाल्यावर व कुलपतींशीं त्यांनीं कुशलप्रश्न व तात्त्विक चर्चा केल्यावर आश्रमांतील मुलांचें बुद्धितेज पहाण्याचा त्यांनीं विचार केला, व आह्मां सगळ्या छात्रांस मंडपांत बोलावून आणून त्यांनीं सौराष्ट्रदेशांतील आपल्या प्रवासाची हकीकत सांगितली.

'माझ्या या प्रवासांत एके दिवशीं एके ठिकाणीं मला या दोन सारिका मिळाल्या,' असें त्यांनीं आपल्या जवळच्या पिंजऱ्याकडे बोट दाखवून आह्मांस ह्मटलें व त्या सारिकांसंबंधीं मंदस्मितपूर्वक ते चमत्कारिक हकीकत सांगूं लागले. 'या सारिकांचें पालनपोषण काकयुगलाकडून होतें व यांच्या घाणेरड्या विष्ठेपासून सुवर्णोत्पत्ति होते' असें सांगून व क्षणभर हंसून 'सारिकांमध्यें व कावळ्यांमध्यें असें प्रेम कां ? आणि यांच्या विष्ठेपासून सुवर्णोत्पत्ति कां होते ?' असे त्यांनीं आह्मांला प्रश्न विचारले.

---

* पोथीचें पान फाटलें असल्यामुळें येथील दोनतीन श्लोक गाळले आहेत.

'ह्या कावळ्यांचीं अपत्यें नष्ट होऊन या सारिकांनांच ते मूर्ख काक अपत्यें समजत असतील' असें एकजण ह्मणाला. पण हें उत्तर त्यांनां समाधानकारक वाटलें नाहीं. 'या सारिकांचा व कावळ्यांचा पूर्वजन्मींचा कांहीं स्नेह असावा,' असें दुसऱ्यानें ह्मटलें; पण यानेंहि चण्डप्रभऋषींचें समाधान झालें नाहीं. 'हे काक ह्मणजे शापानें देहान्त पावलेले ऋषि किंवा ऋषिपुत्र असावेत, व ते या सारिकांचें रक्षण करून यथाशक्ति पुण्य संपादन करीत असावेत,' असें तिसऱ्या एका छात्रानें सुचविलें; परंतु चंडप्रभऋषींनां हें उत्तरहि पटेना. कांहीं सुबुद्ध मुलांनां 'हे काक सारिकांचें खरोखर पोषण करतात कीं नाहीं, व सारिकांच्या विष्ठेपासून खरोखरच सुवर्ण मिळतें कीं नाहीं' अशी शंका आली. पण चंडप्रभ ऋषींच्या विधानाबद्दल शंका प्रकट करणें ह्मणजे त्यांच्या शापाला पात्र करून घेणें होय, या भीतीनें त्यांनीं आपली शंका आपल्या हृदयांतच ठेवली! बुद्धिमान् गभस्तिगतीला ही शंका आली; पण आपल्या गुरूंच्या विधानाबद्दल संशय व्यक्त करणें पाप होय, असें त्या शुद्ध व विनयपूर्ण सच्छिष्यास वाटून तोहि त्या प्रश्नानें भांबावून गेला. या प्रश्नाचें उत्तर आश्रमांतील एका छात्रालाहि देतां येऊं नये, ही गोष्ट आश्रमाच्या व कुलपतींच्या कीर्तीला लांछनास्पद आहे, असें वाटून 'शंका घेण्याचें साहस करूं नये,' असें सुचविणाऱ्या हृदयाचें धडधडणें न जुमानतां मीं अखेर मोठ्या नम्रतेनें मनांत आलेली शंका बाहेर बोलून दाखविली व 'या गोष्टी प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय आह्मीं तरी कसें उत्तर द्यावें? त्या खऱ्या कशावरून आहेत?' असा विनयपूर्वक उलट प्रश्न केला.

चण्डप्रभऋषि दुर्वासासारखे कोपिष्ठ आहेत, अशी छात्रगणामध्यें त्यांची कीर्ति होती. ते आतां या माझ्या धाष्ट्याबद्दल रुष्ट होऊन मला

शाप देतील, अशी सर्वांनां भीति पडली; परंतु त्यांनां याचें कौतुकच वाटलें असावें,असा माझा त्या वेळींच तर्क झाला. त्यांच्या गंभीर मुद्रेवर रोषाच्या ऐवजीं संतोषदर्शक मंदहास्य दिसलें,व माझें हृदय धडधडण्याचें थांबलें. चण्डप्रभ ऋषींनीं मला नंतर दुसरे बरेच प्रश्न विचारले. माझीं उत्तरें ऐकून त्यांनां आनंद झाला असें मला त्यांच्या चर्येवरून दिसलें. त्यानंतर कुलपतींचें व त्यांचें आपआपसांत हास्ययुक्त कांहीं संभाषण झालें व नंतर आमच्या कुलपतींनीं आह्मांला संध्यावंदनार्थ जाण्याकरितां रजा दिली.

रात्रौ भोजनसमयीं आमच्या कुलपतींनीं शेजारीं बसलेल्या एका सुबुद्ध छात्राला ‘ आजच्या प्रश्नाचें उत्तर काय दिलेंस ? ’ असा प्रश्न केला. त्यानें लज्जेनें मान खालीं घातलेली पाहून कुलपति आपण होऊनच ह्मणाले ‘ हे प्रश्न विचारण्यांत चण्डप्रभ ऋषींचा हेतु तुमचा आत्मप्रत्यय पाहण्याचा होता. तुह्मांला योग्य शंका असेल ती तुह्मीं आपल्या गुरुजींनां विचारली पाहिजे. भिऊन जाऊन शंका हृदयांत ठेवण्यानें कोणत्याहि विद्यार्थ्याच्या ज्ञानाची वृद्धि व्हावयाची नाहीं. कोणत्याहि प्रश्नाचा विचार करतांना किंवा कोणत्याहि गोष्टीविषयीं वाद करतांना मूलभूत कोणत्या गोष्टी व कां आपण गृहीत धरल्या आहेत, याचा प्रत्येकानें आधीं विचार करावा. मूलभूत प्रमेयांविषयीं आधीं विचार करावा, व मग बाकीच्या विधानांविषयीं. एकादें मूलभूत विधान जर तुह्मांला अश्रद्धेय किंवा अमान्य वाटत असेल तर तसें आधींच स्पष्ट सांगावें. गुरुवचनांवर श्रद्धा ठेवूं नये असें नाहीं. पण शंका आल्यास ती सांगण्यास चुकूं नये, हें तुह्मांला शिकविण्याकरितां चण्डप्रभ ऋषींनीं आज तुह्मांला असे चमत्कारिक प्रश्न विचारले. ‘ आप्तवाक्य ’ हें एक प्रमाण आहे. पण या प्रमाणाचें महत्त्व किती व कोणत्या विषयांत

याचा विचार लहान मुलांनां समजावयाचा नाहीं.तथापि सुबुद्ध छात्रांनीं या प्रश्नाची आपआपल्या गुरूंजवळ चर्चा करावी. आज आपल्या प्रिय धौम्य बालकानें धीर चेपून उत्तर दिलें, ह्मणून तुमच्या आश्रमाची अब्रू वांचली. लक्ष्मी काय किंवा विद्यादेवी काय,अतिभीरु व अतिलज्जाशील मनुष्यावर कधीं प्रसन्न व्हावयाची नाहीं.या देवींनां आळशी मनुष्य जसा प्रिय होत नाहीं तसा अतिभीरु मनुष्यहि त्यांनां कधीं प्रिय होत नाहीं.'

अशा प्रकारे त्यांनीं जें विवेचन केलें तिकडे माझें विशेष लक्ष नव्हतें. माझ्यासंबंधानें बोलतांना 'आपल्या प्रिय धौम्य बालकानें' असे त्यांच्या तोंडांतून निघालेले शब्द मीं ऐकले आणि कुलपतींचा माझ्यावरचा पूर्वीचा रोष अद्यापि कायम आहे कीं काय ही जी मला भीति वाटत होती ती एकदम स्वप्नतुल्य व [illegible] झाली. त्यांचे शब्द अमृतवर्षावाप्रमाणें मला आनंददायक झाले. कुलपतींनीं माझा आज फार गौरव केला, असें मला वाटलें, व त्यांच्या उदार, क्षमाशील व प्रेमळ अंतःकरणाबद्दल माझी खात्री होऊन त्यांनां संतोष देणें हेंच माझे पवित्र जीवित कर्तव्य, असें मीं त्या दिवसापासून ठरविलें.

असो. अशा प्रकारें माझें बाल्य गेलें. क्रमाक्रमानें सर्व शास्त्रांत प्रावीण्य संपादन करीत करीत मी १७–१८ वर्षांचा झालों. या वेळीं माझा विद्याभ्यासंग इतका वाढला होता कीं मीं आतां खेळण्याविषयीं बराच उदासीन झालों. क्रीडाविनोदादि मीं अगदींच सोडून दिलें होतें असें नाहीं; परंतु तें अगदीं परिमित होतें. गभस्तिगतीचें व माझें वर्तन इतर मुलांनीं अनुकरण करण्यासारखें आहे, असें गुरु आपापसांत (व एकादवेळेस उघडपणें देखील) ह्मणूं लागले. बुद्धिमत्तेविषयीं व विद्याभ्यासंगाविषयीं आमची तेथें फारच कीर्ति झाली. इतकी कीं,

आमच्याहून वयानें अधिक असलेलीं मुलेंसुद्धां आह्मांला काव्यग्रंथांचा वगैरे अर्थ विचारीत असत.

या कालाचें वर्णन करतांना मीं आपल्या घराचा, प्रिय मातेचा व पूज्य पित्याचा उल्लेखसुद्धां केला नाहीं, याचें कारण मी त्यांनां विसरलों होतों असें नाहीं; तर त्यांच्या संबंधानें तुह्माला सांगण्यासारखें या अवधींत विशेष कांहीं घडलेंच नव्हतें. दरवर्षी श्रावणीनंतर गुरूपदेश ऐकून मी आपल्या मातापित्यांनां व बंधुभगिनींनां भेटण्यास घरीं जात असें. विद्येमधील माझें प्रावीण्य पाहून माझ्या पित्याला फारच आनंद होई, व माझ्या मातेला तर मी मोठा पंडित किंवा ब्रालर्षीच आहें असें वाटे! माझी स्नानसंध्या, माझें पाठांतर, माझें विद्वत्व व माझें गांभीर्य पाहून तिला आपल्या जिवाची धन्यता होई! आश्रमांत परत जावयाचे दिवस आले ह्मणजे मात्र तिला अतिशय वाईट वाटावयाचें. अध्ययन व अध्यापन हे ब्राह्मणधर्म होत, हें ती जाणत होती; परंतु आश्रमांत जाण्याचे दिवस जवळ आले ह्मणजे त्या प्रेमळ मातेचें हें ज्ञान निरुपयोगी ठरे, व आश्रमांत जाण्याचे दिवस लांबतील तर बरें असें तिला वाटे!

मला दोन धाकटे भाऊ होते व एक बहीण होती. परंतु या तिन्ही मुलांनां मध्यन्तरीं अतिसार होऊन दैवदुर्विपाकानें अथवा ईशक्षोभानें तीं तिघेंहि त्या रोगास बळी पडलीं, आणि शेवटीं मी आपल्या मातेस एकटाच राहिलों होतों. या खेपेला मी आश्रमांत जाण्यास निघालों असतां या विरहप्रसंगामुळें तिच्या हृदयांत जें कांहीं झालें तें मला सांगतां येत नाहीं. ती शहाणी होती व ती माझ्या वडिलांनां भीत होती; नाहींतर तिनें त्या वेळीं रडूनरडून आकान्तच केला असता. हिरण्यगर्भराजा, दारांतून बाहेर पाऊल ठेवलें त्यानंतर पुनः एकदां

तिच्याकडे वळून पाहिल्यावर तिचें शोकाकुल मुख माझ्या दृष्टीस पडलें व ‘हिला असें दुःख देऊन आश्रमाकडे जावें किंवा नाहीं’ असा माझ्या मनांत विचार आला. परंतु पित्यानें ‘चल, चल, नंतर मुहूर्त चांगला नाहीं,’ असें ह्मटलें व मी--अथवा असें ह्मणण्यापेक्षां माझें शरीर—घराबाहेर पडलें, व आश्रमाची वाट चालूं लागलें. माझें मन घराकडे—मातेकडे लागलें होतें. तिची ती मुद्रा माझ्या दृष्टीसमोरून जाईना. तिच्या त्या शोकाकुल वदनाची आठवण होऊन माझें हृदय, नारदा, अद्यापि शोकविव्हल होत आहे !—कां होणार नाहीं? नारदा, तें मुख त्यानंतर मीं मुळींच पाहिलें नाहीं ! आश्रमांत पोंचतों न पोंचतों तों तिला देवाज्ञा झाल्याची नगराहून बातमी कळली !”

त्या प्रसंगाची आठवण होऊन वृद्ध झालेल्या त्या धौम्यऋषींच्या नयनांत अश्रुबिंदु आले, व कांहीं पळें ते कांहींएक बोलले नाहींत. त्यांनीं डोळे मिटून ध्यान केलें व नंतर डोळ्यांवरून हात फिरवून व मोठा उसासा टाकून ते पुनः गोष्ट सांगूं लागले:—

“हिरण्यगर्भराजा, मनुष्याचें जीवित फार चमत्कारिक आहे. त्या वेळीं हा दुःखद प्रसंग हतका भयंकर वाटला कीं, माझें सारें आयुष्य आतां दुःखमय होणार, असें माझ्या मनानें घेतलें, व मी अगदीं निराश, उदास व विरक्त झालों. माझा उनाडपणा आतां पार निघून गेला. या वेळीं माझें वय बारातेरा वर्षांचेंच असेल, पण मातृदुःखामुळें क्रीडेवरील माझी आसक्ति पार मावळली. मित्रांच्या संगतीचा—गभस्तिगतीच्या पवित्र संगतीचाहि—वीट आला, व तपश्चर्या करण्याची मला बलवत्तर इच्छा झाली. हा ब्रह्मचर्याश्रम नको व गृहस्थाश्रम तर त्याहून नको, असें मला वाटूं लागलें ! घोर तपश्चर्या करून संसारसागरांतून सुटण्याचा मीं निश्चय केला, व हा निश्चय कुलपतींनां कसा कळवावा, याचा विचार करूं लागलों.

एक दिवस संध्याकाळीं आह्मी सर्व तापसकुमार, आमचे गुरु व कुलपति नदीवर संध्यावंदनासाठीं गेलों होतों. माझी संध्या झाल्यानंतर आपला तपोनिश्चय कुलपतींनां कळविण्याच्या हेतूनें त्यांच्याकडे जाण्याचा मीं विचार केला. त्या नदीवरील एका प्रचंड शिलेवर बसून रोज ते तेथें संध्या व मनन करीत असत. मी त्यांच्या त्या पवित्र स्थानाकडे जाऊं लागलों. ते आकाशांतील तारागणाकडे पाहात असून व मनांत निमग्न झाले होते असें मला लांबूनच दिसलें. या वेळीं त्यांच्याजवळ जावें किंवा नाहीं असा विचार मनांत येऊन मी थांबलों. पुढें जाण्याचा मला धीर होईना. इतक्यांत त्यांचीच दृष्टि माझ्याकडे गेली व त्यांनीं मला प्रेमपूर्वक हांक मारून ‘ बाळा धौम्या, तुला काय पाहिजे ?’ असें विचारलें.

मी ह्मटलें ‘ आज गुरूंनीं ऋषींच्या ज्या कथा सांगितल्या त्या ऐकून मलाहि तपश्चर्या करण्याची इच्छा झाली आहे. आपण मार्ग दाखवून द्यावा, अशी माझी प्रार्थना आहे.’

त्यांनीं प्रेमपूर्वक मंदस्मित केलें व ह्मटलें ‘ बाळा धौम्या, तपश्चर्या लहान बालकांनां विहित नाहीं, व ती त्यांनां शक्यहि नाहीं.’

‘ऋष्यशृंगादि ऋषिकुमारांनीं तपश्चर्या नाहीं का केली ?’ मीं नम्रतेनें शंका विचारली, व ‘तसाच मीहि तपश्चर्या करूं शकेन ’ असें ह्मटलें.

हें माझें भाषण ऐकून कुलपति जरा मोठ्यानें हंसले, तरी मीं आपलें बोलणें चालू ठेवलेंच. ‘गुरुजी, जगांत येऊन ब्रह्मपदप्राप्ति करून घ्या, असें आपणच अहर्निश आह्मांला सांगतांना ? आत्मज्ञानाशिवाय ब्रह्मपद-प्राप्ति कशी होईल ? आणि तपश्चर्येशिवाय आत्मज्ञान कसें होईल ? केवळ संसार करण्यांत जन्मसाफल्य नाहीं, असें वाक्य आपल्या मुखांतून

मीं ऐकलेलें आहे. आपण मला आत्मप्राप्तीचा मार्ग दाखवावा, एवढीच माझी इच्छा आहे.'

' परंतु संसार करूं नये, असें मीं कधीं ह्मटलें होतें ? तुझी अद्यापि विद्याहि परिपूर्ण झालेली नाहीं, आणि हा भलताच विचार काय तूं मनांत आणला आहेस ? विद्या कर, संसार कर व मग तुला ज्या वेळेस विरक्ति प्राप्त होईल, त्या वेळेस तुला तपोमार्ग [illegible] मी तयार आहेंच. खरी विरक्ति प्राप्त झाल्याशिवाय या मार्गाचें अवलंबन करणें चांगलें नाहीं.'

त्यांच्या या भाषणानें माझें समाधान झालें नाहीं. उलट तप करण्याचा माझा निश्चय अधिक दृढ झाला. मीं त्यांनां ह्मटलें 'गुरुजी, मला आतां खरोखरच विरक्ति आली आहे. माझ्या मनाची मला खात्री आहे. मी कोणत्याहि मोहाला बळी पडणार नाहीं असें माझें मन मला सांगतें.'

हें शेवटलें वाक्य ऐकून ऋषींनां बरेंच हंसूं आलें. ते या वेळीं कां हंसले, हें मला त्या बाल्यावस्थेंत समजलें नाहीं. असो. गुरुजी मला कांहीं वेळानें ह्मणाले ' बाळा, तुझी तेवढी प्रबळ इच्छा आहे तर मी सांगतों तें कर. आपल्या आश्रमापाठीमागील वटवृक्षाखालीं रोज संध्याकाळीं चार चार घटका ओंकारनामाचा दशसहस्र जप करीत जा. कोणताहि मोह उत्पन्न झाला तरी स्थान सोडावयाचें नाहीं, हें ध्यानांत ठेव.'

' प्राण गेला तरी मी स्थान सोडणार नाहीं ' असें मीं आवेशानें ह्मटलें व नंतर कांहीं वेळानें आह्मी आश्रमांत परत आलों. दुसऱ्या दिवशीं मीं त्या वटवृक्षाखालची जागा संमार्जन वगैरे करून जपकर्मोचित केली. मला तेथें सडासंमार्जन करतांना पाहून आश्रमांतील मुलें

तेथें आलीं व 'धौम्या, हें काय करीत आहेस ?' असें मला विचारूं लागलीं. कांहीं मुलें माझी चेष्टा करूं लागलीं. ही त्यांची चेष्टा मला सहन करणें कठीण गेलें. जरत्कारु गुरूंची नात सुलोचना हीहि कांहीं वेळानें येथें आली व हरिणीसारखी निश्चल व विशाल डोळ्यांनीं माझ्या कृत्याकडे पाहात राहिली. मी कां झाडलोट करीत आहें, हें तिला समजेना. ती मजजवळ आली व 'येथें कोणता खेळ खेळावयाचा आहे ?' असें तिनें विचारलें.

'खेळण्याकरितां जागा तयार करीत नाहीं, तर तपाकरितां.' मीं तिला सांगितलें.

'तप ह्मणजे काय ? मी पण तप करत्यें.' ती ह्मणाली.

'तूं लहान आहेस!' जणूं काय मी त्या वेळीं फार मोठा होतों ! असो. पण सांगावयाची मौज अशी कीं, तिला माझें बोलणें खरें वाटलें ! माझ्याकडे पाहात कांहीं वेळ ती तेथें उभी राहिली व नंतर निघून गेली.

संध्याकाळ झाल्यानंतर वटवृक्षाखालीं संमार्जन करून स्वच्छ केलेल्या स्थलीं ऊर्णासनावर बसून मी जप करण्यास आरंभ केला. लगेच वैश्वदेव करून बलि बाहेर टाकल्यावर काक जसे गोळा होतात व कावकाव करूं लागतात, तसा मुलांचा घोळका माझ्या भोंवतीं जमला, व ते माझ्या भोंवतीं जमून माझ्याकडे पाहून हंसूं लागले व मला चिडवूं लागले. गभस्तिगतीहि सौम्यपणें माझी मस्करी करूं लागला.

एका छात्रानें तर माझ्या अंगावर हळूच एक लहान दगड मारला. त्याला धरून चोप द्यावा, असें माझ्या मनांत आलें; परंतु 'कोणताहि मोह पडला तरी जागा सोडूं नको,' असें कुलपतींनीं सांगितलें होतें, त्याची आठवण होऊन मीं आपल्या कोपाचें नियमन केलें. मी मौन

स्वीकारल्यामुळें कांहीं वेळानें मुलें कंटाळलीं व तीं दुसरीकडे क्रीडा करण्यास गेलीं.

मीं डोळे मिटून ओंकाराचा जोरानें जप चालविला. इतक्यांत सभोंवतालच्या पातेऱ्यांत कसलासा चमत्कारिक आवाज झाला. डोळे उघडून पाहिलें तों त्या पातेऱ्यावरून एक नागीण माझ्याकडेच येत आहे! दुसरीकडूनहि दुसरा एक साप माझ्याकडे येतांना मला दिसला. मी घाबरून गेलों. पाठीमागें पाहिलें तों तिकडेहि साप! हे पांचसहा माझ्याकडेच कां येत आहेत? येथून पळून जावें काय? आणि कोणी-कडे जावें? 'स्थानत्याग करणार नाहीं' असें वचन दिलें होतें, त्याचें काय? माझें धैर्य गळून गेलें. अंगाला घाम सुटला. पाय लुले पडले. डोळे अंध झाले. वाणी मुकी झाली. गुरुजींचा मनांत धांवा केला व 'स्थानत्याग करूं का नको?' असें त्यांनां मनांत मोठ्यानें विचारलें.

'बाळ धौम्या, घाबरूं नकोस!' अशी वाणी मीं ऐकली.

डोळे उघडून पाहतों तों कुलपति माझ्या समोर उभे आहेत. साप तेथें एकहि दिसेना. फक्त सुलोचना कुलपतींजवळच उभी होती, व 'तप ह्मणजे काय?' असें त्यांनां बालिशतेनें विचारीत होती.

'साप कोठें गेले?' मीं विचारलें.

'येथें साप नव्हते.' कुलपति ह्मणाले.

'मीं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पांचसहा साप पाहिले!' मी जोरानें ह्मणालों.

'तूं पाहिलेस ते खरोखरचे साप नव्हते. ते षड्रिपु होते. हे षड्रिपु मनुष्याला धर्मच्युत करीत असतात. त्यांनां वश करण्याच्या आधीं या तपाच्या नादीं लागणें योग्य नव्हे. बाळा, नागिणीभयाचें नियमन करणें तुला आतां जितकें कठीण गेलें तितकें तरुणपणीं स्त्रीमोह किंवा धनमोह जिंकणें कठीण जातें.'

'स्त्रीमोह ह्मणजे काय ?' सुलोचनेनें विचारलें.

गुरुजींनीं मंदस्मित केलें व मीहि हंसलों. पण लगेच मीं विचारलें 'नागिणीला पाहून भ्यायलों, ह्मणून मी स्त्रियांनां पाहून मोहान्ध होईन, असें कसें ह्मणतां येईल? गुरुजी, मला ऋष्यशृंगाप्रमाणें तपोधन होण्याची इच्छा आहे. ती सफल करणें आपल्या हातीं आहे.'

'सर्पांची तुला भीति कां वाटली?' त्यांनीं विचारिलें.

'मला ते चावतील अशी मला भीति वाटली.'

'चावले असते ह्मणून काय झालें असतें? आत्मप्राप्तीकरितां प्राणत्याग करण्यासहि तूं तयार आहेस ना? तपाची इच्छा अधिक आहे कीं जगण्याची?'

मी यावर कांहींच बोललों नाहीं. काय बोलणार? मी दुर्मुख होऊन स्वस्थ बसलों आहें, असें पाहून कुलपति ह्मणाले 'बाळा, याप्रमाणेंच तरुणपणीं तपापेक्षां अर्थ व काम अधिक प्रिय होतात, आणि यांपेक्षां स्वाभिमान फार कठीण. तुला हीं तत्त्वें एवढ्यांत कळावयाचीं नाहींत! माझें ऐक व आपला आग्रह आतां सोडून दे. विद्या प्रथम प्राप्त करून घे, आणि आजची तुझी इच्छा त्या वेळीं जर कायम राहिली तर येथेंच राहून तूं तपश्चर्या कर. तूं मोठा तपस्वी झालास तर मला आनंदच होणार आहे.'

असें ह्मणून ते निघून गेले. कुलपतींविषयीं मला आदर होता, व सर्पभीतीनें माझें दर्पहरण झालें होतें, त्यामुळें त्यांचें ह्मणणें मीं त्या वेळीं कबूल केलें; पण अर्थ व काम या मोहांनां मी वश होईन, असें त्यांनां वाटतें तरी कसें, याचें मला राहून राहून आश्चर्य वाटलें! इतकेंच नाहीं तर या संशयाबद्दल मीं त्यांनां आपल्या मनांत दोष दिला!

इति श्रीपाराशरपुराणे बालतपोनिश्चयो नाम द्वितीयोऽध्यायः समाप्तः।

शुभं भवतु॥

## अध्याय तिसरा.

### परिहास दुर्विपाक.

श्रीगणेशायनमः । धौम्य पुनः ह्मणाले ‘ बालपणचे ते दिवस, त्यांची आठवण करावी तेवढी थोडीच ! हिरण्यगर्भराजा, आह्मीं आश्रमांत जें सुख भोगलें, त्या सुखापुढें राजाच्या सुखाचीहि कांहीं महती नाहीं ! राजाला कांहीं घटका तरी शत्रूंची काळजी वाटत असेल; पण आह्मांला त्या वेळीं कशाचीच काळजी नव्हती. दिवसांतून ६० हि घटका आमच्या आनंदांत जावयाच्या !

कांहीं वेळ अध्ययन, कांहीं वेळ वनश्री पाहणें, कांहीं वेळ जलक्रीडा करणें, कांहीं वेळ दुसऱ्या क्रीडा करणें, कांहीं वेळ गुरूंचा सदुपदेश ऐकणें, इत्यादि गोष्टींत आमचा दिवस कसा निघून जात असे, हें आह्मांला कळत नसे, व असे दिवस जातां जातां वर्षेहि तेव्हांच संपून जावयाचें ! आमचें ज्ञानार्जन चाललें होतें, पण आह्मी ज्ञानार्जन करीत होतों, अशी आह्मांला कष्टकर भावना नव्हती. आश्रमांतील लतांवरील कलिका जशा श्रमाशिवाय प्रतिदिनीं विकास पावतात, तसाच जणूं काय आमचा श्रमहीन विकास होत होता. गुरुजींचें अध्यापन चाललें असतां, तें केव्हां संपेल असें आह्मांला कधीं झालें नाहीं. आमच्या आश्रमांतील गुरुजींच्या अध्यापनामध्यें क्रीडनाची गोडी होती व क्रीडनामध्यें उदार नीतितत्त्वें बिंबविलीं जात होतीं. गुरुजींबरोबर वनश्री पाहण्यास गेलों ह्मणजे सहज बोलतांबोलतां आह्मांला अनेक वृक्षांचे, लतांचे आणि मूलांचे गुणधर्म कळावयाचे. आमचे गुरुजी कित्येक वेळां आह्मांला रात्रींहि मोकळ्या मैदानांत नेत

असत, व त्या वेळीं ग्रह, राशि, नक्षत्रें, इत्यादिकांची आह्मांला ते माहिती करून देत व त्यांच्या गति कशा मोजतात, ‘ वक्री ’ गति ह्मणजे काय, ‘ मार्गी ’ गति ह्मणजे काय इत्यादि गोष्टींची फोड करून सांगत असत. निरनिराळ्या ग्रहांसंबधीं ज्या पौराणिक कथा आहेत, त्यांचीहि या वेळीं उजळणी होत असे व त्यांपासून बोध काय घ्यावा हें आह्मांला अप्रत्यक्षपणें सुचविण्यांत येत असे. आमचे गुरु आह्मांला पित्याप्रमाणेंच वाटत. असो. नारदा, बालपणचे ते दिवस; त्यांची आठवण झाली म्हणजे तपश्चर्येमुळें माझ्यामध्यें आतां आलेली माझी मौनप्रियता पार मावळून जाते. या कालांतील सर्वच गोष्टी मला आतां सांगाव्याशा वाटत आहेत. पण तूर्त त्या सांगत नाहीं. एकच मनोरंजक हकीकत सांगतों.

आमच्या आश्रमापासून दोन योजनांवर ‘ क्षीरोदक ’ नांवाचें एक स्वच्छ सरोवर होतें. त्याच्या कांठीं एक अंबिकेचें देऊळ होतें. चैत्रमासीं शुद्ध सप्तमी, अष्टमी व नवमी या दिवशीं त्या स्थानाचें मोठें माहात्म्य मानलें जात होतें. इतकें कीं, तें स्थान अरण्यांत असूनहि त्या दिवसांत तेथें पंधरावीस हजार यात्रा जमत असे. आमच्या आश्रमांतहि हे तीन दिवस अनध्यायाचे समजत असत. प्रौढ मुलांनां यात्रा पाहण्यास नेण्याचें ठरलें. मी त्या वेळीं, मला वाटतें, तेराचौदा वर्षांचा असेन. मला, गभस्तिगतीला, मृगपुत्राला वगैरे ‘ लहान ’ मुलांत काढण्यांत आलें असल्यामुळें आह्मांला फार वाईट वाटलें. यात्रा पाहाण्याची आमची फार इच्छा होती. आह्मां लहान मुलांनां यात्रा पाहण्याची जितकी उत्सुकता होती, तेवढी मोठ्या मुलांनां असणें शक्य नाहीं; परंतु गुरुजी मोठ्या मुलांनांच घेऊन जाणार असल्याचें कळल्यापासून गुरुजींचा आह्मांला जरासा राग आला. ‘ज्यांनीं यात्रा पुष्कळदां

पाहिली आहे,त्यांनां गुरुजी घेऊन जात आहेत व आह्मीं यात्रा मुळींच पाहिली नाहीं, तरी, आह्मांला लहान मुलें समजून घेऊन जात नाहींत; खासा न्याय!' अशी आह्मी गुरुजींवर आपापसांत टीका करूं लागलों.

यावर उपाय ह्मणून गभस्तिगती,मी व दुसरे पांचसहाजण जरत्कारुगुरूंकडे गेलों. त्यांचें हृदय फार मृदु होतें. त्यांच्याजवळ आपलें गाऱ्हाणें सांगून व त्यांच्याकडून कुलपतींनां सांगवून यात्रेला जाण्याची आपली इच्छा सफल करण्याची आमची मनीषा होती.

'गुरुजी,' मीं म्हटलें 'लहानपण सगळयांत चांगलें, असें काव्यांत ह्मटलें आहे तें चुकीचें दिसतें. लहानपण हें एक मोठे पाप आहे!'

'कां? लहानपणानें काय केलें आहे?' त्यांनीं विचारलें.

'आह्मी लहान ह्मणूनच आह्मांला तुह्मी यात्रेला जाऊं देत नाहीं; तेव्हां लहानपण ह्मणजे पापच नव्हे तर काय?'

'तुह्मांला इतकें लांब चालतां येणार नाहीं.' ते ह्मणाले व 'भलता आग्रह धरूं नये,' असा उपदेश करूं लागले. 'आह्मी चारचार पांचपांच कोस पुष्कळदां चालून आलों आहों,' इत्यादि गोष्टी सांगून आह्मीं आपली बाजू जोरानें मांडली. 'लहान मुलांनीं यात्रेची मजा पहावयाची का मोठ्या मुलांनीं?' असा त्यांनां आह्मीं लडिवाळपणानें प्रश्न विचारला. जरत्कारू गुरूंनीं आमच्या दुराग्रहाचा बाहेरून निषेध केला व आह्मांला जाण्यास सांगितलें. पण कांहीं वेळानें सुलोचना त्यांचा हात धरून त्यांनां कुलपतींकडे घेऊन जात आहे, असें आह्मीं पाहिलें. आमच्याकरितां रदबदली करण्यासाठीं ते जात आहेत, हें आह्मीं ओळखलें. झालें. आह्मांलाहि घेऊन जाण्याचें ठरलें आहे, असें आह्मांला दोन घटकेनें कळविण्यांत आलें. आमच्या आनंदाला पारावार नाहींसा झाला.

'क्षीरोदक' सरोवर एकंदरींत यंदा आह्मी पोहणार, असें वाटून आमची आह्मांला धन्यता वाटली!

परंतु त्या वर्षी क्षीरोदकाचें व अंबिकेचें दर्शन घेण्याचें आमच्या नशिबीं नव्हतें! अर्धाएक कोस मार्ग चाललों असेलनसेल, इतक्यांत आह्मांला एक आम्रवृक्ष लागला. त्यावर आम्रफलांचे घडच्या घड आलेले होते. पतंगाला जशी दिव्यावर जाण्याची अनिवार इच्छा होते तशी आंब्यावर चढण्याची आह्मां मुलांनां दुर्निवार इच्छा झाली. 'अशा रीतीनें गमत गेल्यास उशीर होईल' असें आमच्याबरोबर आलेल्या गुरुजींनीं सौम्य रीतीनें आह्मांला सांगितलें, परंतु बहुतेकांची अत्युत्कट इच्छा पाहून त्या वृक्षावर चढण्याची त्यांनीं परवानगी दिली. अनुज्ञा मिळाल्याबरोबर आह्मी दहाबारा मुलें वानरांप्रमाणें त्या आम्रवृक्षावर चढलों. त्या वृक्षाभोंवतीं बरींच निवडुंगाचीं झाडें होतीं, व जिकडेतिकडे कंटक पसरलेले होते; पण कंटकांनां कोण विचारतो? आणि चमत्कार असा कीं, आह्मी आम्रवृक्षावर चढण्याकरितां अविचारानें धांवलों, पण कोणालाहि कांटा रुपला नाहीं! असो. गभस्तिगति खालींच राहिला व आम्रफलें टाकण्यास मला सांगूं लागला. मीं त्याला दोनतीन फळें दिलीं. वेतसांग वगैरे दुसरीं लहान मुलेंहि मजजवळ आंबे मागूं लागलीं.

वेतसांगाला मीं दोनतीन आंबे टाकले. तेवढ्यांवर खूष होऊन वेतसांग एक फल खात नर्मोनर्मोच्या हरिणगणांकडे पाहूं लागला. त्याची पाठ माझ्याकडे होती. त्याला आणखी एक फल देण्याचें मिष करून दुष्ट विनोदबुद्धीनें त्याच्या पाठींत एक लहान आंबा मारावा, अशी मला पापेच्छा झाली. गुरुजींची भीति होती; पण त्यांचें लक्षहि हरिणगणांकडे गेलें आहे असें पाहून वेतसांगाच्या अंगावर मीं एक

लहान कुचकें फळ मारिलें व 'वेतसांगा, हा घे आंबा' असें ह्मटलें; परंतु ते शब्द मीं हवेंतच उच्चारले असतील! कारण त्याच्या पाठींत नेमकें तें फळ मारण्याकडे माझें लक्ष गेल्यामुळें माझा पाय तें फळ फेंकण्याच्या जोरांत घसरला व मी एकदम त्या कांटेरी निवडुंगांतच पडलों! मला त्या वेळेस काय वाटलें हें मला सांगतां येत नाहीं. हातांत, पायांत, पाठींत व डोक्यांत जिकडेतिकडे कांटे भरलेले. हाय, हाय! त्या वेळच्या माझ्या दुःखाची आठवण झाली ह्मणजे अजून अंगावर कांटे उभे राहतात. पायांत एक कांटा रुपला तर मनुष्याची काय स्थिति होते याचा, हिरण्यगर्भराजा, विचार कर, आणि मग हातापायांत, मांड्यांत, गळ्यांत, सगळीकडे कांटे शिरले असतां व कांहीं मोडले असतां मला काय झालें असेल याची कल्पना कर! आईची व वडिलांची मूर्ति एकदम डोळ्यांपुढें उभी राहिली; व डोळे पाण्यानें भरून आले. कुलपतींचें, प्रिय जरत्कारुगुरूंचें, त्यांच्या सुलोचनेचें वगैरे स्मरण होऊन मनाला कसेंसेंच वाटलें. भीष्म शरपंजरीं पडले असतां त्यांनां किती दुःख झालें असेल, असा एक विचार त्या भयंकर स्थितींत देखील मनांत येऊन गेला, ही एक सांगण्यासारखी गोष्ट आहे. माझ्या मनांत काय आलें हें आतां सांगतांना मला वेळ लागत आहे; पण त्या वेळीं हे एका क्षणांतलेच विचार होते. आमचे गुरुजी व खालीं राहिलेले सर्व छात्र लगेच माझ्या साहाय्याकरितां धांवले. माझ्यापर्यंत ते येणार कसे? निवडुंगाच्या मी मध्यभागीं पडलेला! कांट्यांत पाय घालतो कोण? पाय घातला कीं, कांटेरी फांदीच मोडून जावयाची व पाय कांट्यांत जावयाचा! तरी पण भस्तिगति काठीच्या आधारानें माझ्याजवळ आला; परंतु शेवटीं चाच पाय कांट्यांनीं भरला व तो माझ्यासारखाच अडकून राहिला!

गुरुजींनीं झाडाच्या फांद्या तोडून आणून टाकण्यास कांहीं छात्रांस सांगितलें; परंतु फांद्या येईतोंपर्यंत वाट न पाहतां व स्वतःच्या पायाची वगैरे पर्वा न करितां ते आंत शिरले. त्यांचाहि पाय कांट्यांत अडकला; पण त्यांनीं तो तसाच वर उचलला व ते अखेर माझ्याजवळ येऊन पोहोंचले. वेतसांग व शशपाद हे लवकरच तेथें कसेबसे आले, व ते चौघेजण मला उचलूं लागले. पण त्या अडचणींत मला उचलणें कठीण गेलें. अखेर त्यांनीं उचललें. पण उचलल्याबरोबर कांहीं कांटे मोडले व मला असह्य वेदना झाल्या. कांहीं शुष्क व कंटकमय शाखा माझ्या वस्त्रांत अडकून वर उचलल्या गेल्या. त्या शाखा दुसऱ्या शाखांत चिकटल्या असल्यामुळें त्या सोडवून काढणें जवळजवळ अशक्य दिसूं लागलें. आतां काय करावयाचें! गुरुजी भांबावून गेले व माझे मित्र रडण्याच्या बेतांत आले. इतक्यांत बाहेर असलेल्या लहान मुलांनीं झाडाच्या पडलेल्या दोन फांद्या कोठूनशा आणल्या व त्या कांटेरी फडावर टाकल्या. त्या फांद्यांवर त्या चौघांनां पाय ठेवण्यास सांपडल्यामुळें पुढचें काम सोपें गेलें. कसेंबसें त्यांनीं मला बाहेर काढलें आणि जमिनीवर अलगच ठेवलें. तरी सुद्धां जमिनीवर ठेवल्याबरोबर कांहीं कांटे चटकन मोडलेच. माझी मित्रमडळी सभोंवतीं जमली व कांटे सोडवून काढूं लागली. परंतु एकीकडे सोडवायला लागले कीं, दुसरीकडून कांटे मोडत. तरी त्यांनीं आगगाकडून होईल तितक्या काळजीनें माझ्या वस्त्रांतील व अंगांतील बरेच कांटे काढले व नंतर मला ते उचलून आश्रमांत घेऊन गेले.

या प्रसंगीं गभस्तिगतीनें माझ्याकरितां कांट्यांत जी उडी घेतली व नंतर माझी जी सेवा केली ती पाहून त्याचा मी कांहीं कालापूर्वी जो द्वेष करीत होतों, त्याची मला लज्जा वाटली, व मी मेल्यापेक्षांहि मेल

झालों. तेव्हांपासून त्याचें खरें हृदय मला कळून आलें, व आमचा स्नेह तेव्हांपासून फारच उत्कट व दृढ झाला. असो. कुलपतींनां माझी हकीकत जेव्हां कळली, तेव्हां ते लगेच माझ्याकडे आले, व माझी ती दीन स्थिति पाहून ‘ बाळा धौम्या, कायरे तुझी अवस्था ही ! ’ असें त्यांनीं मोठ्या प्रेमानें ह्मटलें, व भान न राहतां त्यांनीं माझ्या पाठीवरून कळवळयानें हात फिरविला ! परंतु माझ्या पाठींत कांटे मोडल्यामुळें त्यांच्या हस्तस्पर्शानें मला असह्य वेदना झाल्या व माझ्या तोंडून एकदम विव्हलोद्गार निघाले. यामुळें त्यांनां अतिशय वाईट वाटलें व त्यांच्या डोळ्यांत अश्रुबिंदु आले. ते इतके कोमल मनाचे असतील अशी आमची कल्पना नव्हती. त्यांची शांत, गंभीर, किंबहुना उग्र मुद्रा, त्यांचें व्रतकार्कश्य, व शासन करण्यांत त्यांचा दिसून येणारा कठोरपणा इत्यादि गोष्टी पाहून आह्मांला भीति वाटत असे, व ते निर्दय असावेत असा आह्मीं कधींकधीं तर्क करीत होतों. परंतु त्यांचें हृदय कुसुमकोमल होतें, अशी माझी आतां खात्री झाली व त्यांच्याविषयीं अत्यन्त आदर व प्रेम वाटूं लागलें. असो. कांहीं दिवसांनीं मी चांगला बरा झालों. गुरूंची कृपा व आशीर्वाद, संवगड्यांची सेवा आणि निरामय व वर्धिष्णु बालशरीर, यांपैकीं एकेकहि मला बरें करण्यास समर्थ झालें असतें; मग हीं सर्व एकवटल्यावर मी लवकरच बरा झालों, याच्यांत नवल काय ?

इति श्रीपाराशरपुराणे परिहासदुर्विपाको नाम तृतीयोऽध्यायः समाप्तः ।

शुभं भवतु ॥

*

# अध्याय चौथा.

## प्रेमयज्ञ.

श्रीगणेशाय नमः । धौम्य ह्मणाले 'हिरण्यगर्भ राजा, बालपणच्या गोष्टी किती सांगितल्या तरी संपावयाच्या नाहींत. पण त्या आतां मी तुला सांगत नाहीं. नवयौवनाच्या गोष्टी तुला अधिक प्रिय असतील, तेव्हां आतां त्याच सांगण्यास आरंभ करतों. गभस्तिगतीनें व मी आश्रमांत एक तपाहून अधिक काळ एकत्र घालविला होता. एवढ्या अवधींत आह्मीं वेद, वेदांग व षट्शास्त्रें अवगत करून घेतलीं होतीं. परंतु तेवढ्यानें अध्ययनाची आमची आवड कमी झाली नाहीं. उलट जिज्ञासा अधिकच तीव्र झाली. या आश्रमांतच अध्ययन व अध्यापन करीत जन्म घालवावा, असें आह्मांस वाटूं लागलें. गुरुजी व कुलपतीहि आतां आमच्याशीं अर्धवट बरोबरीच्याच नात्यानें वागत असत. आश्रम सोडल्यानंतर गृहस्थाश्रमांत कसें वागावें, त्यांत मोह कसे असतात, इत्यादि गोष्टींविषयीं ते आह्मांला एक दिवस बोलतांबोलतां उपदेश करीत होते. उपदेश ऐकून घेतल्यावर मीं सहज ह्मटलें ' आह्मांला आजन्म या आश्रमांतच रहावेंसें वाटत आहे. अध्ययन आणि अध्यापन हाच ब्राह्मणाचा धर्म. ' हें ऐकून गुरुजींनां आनंद झाल्यासारखें दिसलें. ते ह्मणाले ' तुह्मी पुढें येथेंच राहिलेत तर मला आनंदच आहे. जरत्कारुगुरु आतां वृद्ध झाले आहेत व विभाण्डक गुरुहि फारच वृद्ध आहेत. त्यांनां आतां या वयांत त्रास देणें इष्ट नाहीं. तुमची षण्मासानंतर व्यवहारदृष्ट्या विद्या समाप्त होईल. त्या वेळेस आश्रमांतच राहण्याची तुमची इच्छा कायम राहिली, तर तुह्मी पुढेंहि येथेंच अध्ययन व अध्यापन करीत रहा. आह्मी तरी आतां वृद्धच होत चाललों आहों.

तुह्मी आमचे पुत्रच आहांत. तेव्हां आमचा हा वानप्रस्थाश्रमांतील संसार तुमच्यावर हळुहळू सोंपवावा, हेंच उचित होय.'

कुलपतीचे हे गौरवपर व प्रेमपूर्ण शब्द ऐकून आह्मांला किती आनंद झाला, व किती अभिमान वाटला, हें सांगण्याची जरूर नाहीं. व्यवहारदृष्ट्या 'समाप्तविद्य' झाल्यावर येथेंच ब्रह्मचर्यांत रहावयाचें, असा गभस्तिगतीनें व मीं निश्चय केला. परंतु हा हेतु सफल होण्याच्या कामीं लवकरच एक गंडांतर आलें व आमच्या दोघांमध्यें द्वेषभाव उत्पन्न होण्याचा प्रसंग आला!

माझें मन लहानपणीं क्रीडेनें, व पुढें विद्येनें जसें आकर्षण करून घेतलें होतें, तसें आतां एका युवतीनें आकर्षण करून घेतलें. आमचें दुर्दैव हें कीं, आह्मी दोघे स्नेही एकाच स्त्रीच्या मोहिनीला बळी पडलों. जरत्कारुगुरूंची सुलोचना नांवाची नात होती, ह्मणून मागे सांगितलें; तिनेंच आह्मां दोघांनां सुरूप–सद्गुण मोहजालांत पकडलें. पण तिचा तरी त्यांत काय अपराध? ईश्वरानें तिला सुन्दर केलें व तिच्या पितामहानें तिला सुविनीत केलें, त्यांत तिचा काय दोष? आणि सुवासिक पुष्पावर जसे भृंग लुब्ध होतात तसे आह्मी तिच्या सुकुमार सौंदर्यावर व सद्गुणांवर लुब्ध झालों, यांत आमचा तरी काय दोष? हा दैवाचा दोष आहे, दुसरा कोणाचा नाहीं! नारदा, तूं कांहीं ह्मण, पण दैव ह्मणून कांहीं पदार्थ आहेच! दैव, दैव, दैव! हें दैव जगांत किती अनर्थ घडवून आणीत आहे!

आह्मी लहानपणीं जरत्कारुगुरूंकडे शिकण्यास जात असतां, सुलोनाहि तेथें श्रवण करीत बसावयाची, हें मागें सांगितलेंच आहे. तिच्याबरोबर त्या वेळेस आह्मी पुष्कळ वेळां खेळलों होतों. पुढेंपुढें

ती आमच्यामध्यें खेळण्यास येईनाशी झाली. शशिप्रभा, मालिनी, अनसूया इत्यादि कन्यकांशीं तिचें मग सख्य जुळलें. आश्रमांत या मुली कशा आल्या, याचें नारदा, तुला आश्चर्य वाटेल. पण याचें कारण असें आहे. आमचे कुलपति स्त्रियांनां आश्रमांत घेत नसत. परंतु जरत्कारुगुरु आश्रमांत अध्यापन करूं लागल्यापासून पांचसहा वर्षांनंतर त्यांच्या पुत्रास यमराजानें सर्पदंशाचें निमित्त करून या जगांतून नेलें. कांहीं दिवसांनीं त्यांची सूनहि निवर्तली व सुलोचना ही एकटी निराधार पडली. जरत्कारुगुरूंनां ही बातमी कळल्यावर त्यांनां मोठी पंचाईत पडली. सुलोचनेची काळजी घेणारें मायेचें दुसरें माणूस कोणी नव्हतें. आतां सुलोचनेला आश्रमांत आणावी तर तेंहि अप्रशस्त, व न आणावी तर त्या एक दीड वर्षाच्या मुलीला कोण संभाळणार? अशी त्यांची चमत्कारिक स्थिति झालेली पाहून कुलपतींनींच ‘ प्रत्येक गोष्टींत सारासार विचार केला पाहिजे ’ असें ह्मणून त्यांनां नातीला घेऊन येण्यास सांगितलें, व तेव्हांपासून सुलोचना हरिणबालिकेप्रमाणें आश्रमांतच वाढली. मालिनी, अनसूया इत्यादि कन्यकांच्या अशाच कथा आहेत. पण त्या सांगण्याची आवश्यकता नाहीं.

आमचें दोघांचें प्रेम सुलोचनेवरच कां जडावें? नारदा, याला दैवाशिवाय दुसरें कारण सांगतां येईल काय? मालिनी वगैरे मुली रूपानें काय कमी होत्या? त्यांपैकीं एकादीनें आमच्यापैकीं एकाचें मन कां आकर्षण करून घेतलें नाहीं? त्या रूपांत, का ज्ञानांत, का शीलांत, का कशांत कमी होत्या?

नारदा, हा प्रश्न मीं आतां आवेशांत विचारला खरा; पण त्या वेळीं त्या कन्यका प्रत्येक गुणांत कमी होत्या असें आह्मांला वाटलें. सुलोचना ती सुलोचना, व इतर मुली त्या इतर मुली! तिची सर कोणाला यावयाची

नाहीं. माधुर्याची ती मूर्ति होती. तिचे अवयव जितके कोमल, तितकेंच तिचें मन कोमल होतें. तिचें शरीर जसें मोहक व मधुरधवल, तितकेंच तिचें हृदयहि प्रेमळ व शुद्ध होतें. तिचें भाषण ह्मणजे गायन. तिच्या चेहऱ्यांत साऱ्या जगतांतील सौंदर्य भरलें होतें. फार काय, त्या हरिणाक्षीच्या नयनांमध्यें सारें ब्रह्मांड भरलें होतें. तिच्या केशकलापाकडे पाहून मयूरांची स्मृति व्हावी; तिच्या नासिकेकडे पाहिल्यावर चंपककलिका डोळ्यांपुढें उभी रहावी; व तिच्या तनु—बाहुयुगलांकडे पाहून कोमल लतांचा रम्य आभास व्हावा. तिचे स्तन कमंडलूसारखे होते व तिचें हृदय ऋषींसारखें शुद्ध व निष्कलंक होतें. तिचा विहार व विनोद ऋषिकुमाराप्रमाणें निरागस मधुर होता. होमाग्नीचें तिच्यांत पावित्र्य व तेज होतें व तिच्या शब्दांत वेदमंत्रांचें सामर्थ्य होतें. थोडक्यांत सांगावयाचें, ह्मणजे ती आमच्या आश्रमाची अधिदेवताच होती, असें आह्मांला त्या वेळीं वाटत होतें.

नारदा, तूं सर्वविद् आहेस. 'काम' मनुष्याला कसा प्रमत्त आणि उन्मत्त करतो, हें तुला सांगण्याची जरूर नाहीं. पण नारदा, ज्या आह्मां दोघांनां विद्या हीच आदरणीय देवता वाटत होती, त्यांनां या अंगहीन कामानें एका कोमल अबलेच्या मोहांत घालावें, हें आश्चर्य नाहीं का! कामा, तूं विरोधी गुणांचा पुतळाच आहेस. तूं अनंग असून अबलांनांहि प्रबल करतोस. तूं शत्रूसारखा ताप देतोस, तरीहि तूं मानवांनां प्रिय होतोसच! कोमल पुष्पांचे तूं बाण करतोस आणि शीतल चंद्रज्योत्स्नेला तूं संतापदायक स्वरूप देतोस. तूं बुद्धीला मोहनिद्रेंत ढकलतोस, पण शरीराला रात्रभर जागवतोस. तूं मित्राला शत्रू करतोस व शूराला अबलेपुढें वांकण्यास लावतोस. कामा, दुसरे

शंभर शत्रू पतकरतील, पण तुझ्या एकट्यापुढें मानवांनां हात जोडावे लागतात!*

असो. गभस्तिगतीचें व माझें मन एकमेकांनां तेव्हांच कळलें. आमच्यामध्यें शत्रुत्व येण्याची पाळी आली. दुसरा कोणी मनुष्य असता तर या कामीं मीं त्याच्याशीं वैरच केलें असतें. परंतु उदारबुद्धि गभस्तिगतीशीं मदनाच्या पायीं वैर करावयाचें नाहीं, असा मीं विचार केला व भांडण होऊं नये ह्मणून पुढील गोष्ट सु[illegible]रितां त्याच्या पर्णकुटीकडे मी जाऊं लागलों. विद्या समाप्त झाल्यावर जरत्कारुमुनींकडे दोघांनीं जाऊन त्यांच्या नातीची दोघांनींहि मागणी करावी, व ते ज्याला देतील त्यानें आपणांस धन्य समजावे,असें त्याला मी सुचविणार होतों, व जरत्कारु गुरूंनीं मला नापसंत केलें तरी मी तुझा द्वेष किंवा असूया करणार नाहीं, व स्नेहांत अंतर पडूं देणार नाहीं, असें मी त्याला अंतःकरणपूर्वक आश्वासन देणार होतों. इतक्यांत गभस्तिगति मजजवळ आला व मला ह्मणाला ‘ मित्रा धौम्या, मी आतां कुलपतींकडे गेलों होतों. आपल्या दुर्विलासी प्रेमाची त्यांनां मीं हकिगत सांगितली, व अशा प्रसंगीं कसें वागावें, असें त्यांनां विचारलें. त्यांनीं क्षणभर ध्यान केलें. त्या क्षणीं भूत, वर्तमान व भविष्य, सर्व गोष्टी त्यांच्या ज्ञानचक्षुंपुढें उभ्या राहिल्या आहेत, अशी त्यांची मोठी सूचक मुद्रा झाली. ‘ हरे राम, हरे राम ’ असे त्यांच्या तोंडांतून उद्गार निघाले.

---

* या चारपांच श्लोकांतील श्लेष व विरोधाभास हे अलंकार भाषान्तरांत चांगले साधणें शक्य दिसत नाहीं. या कृत्रिम भाषाशैलीवरून हें पुराण बाणाच्या काळचें—शेंदोनशें वर्षांनीं मागचें पुढचें असावें, असें वाटतें. पुढील अध्यायांतील कांहीं श्लोकांत तर बाणाची नक्कलच केलेली दिसते, किंवा कदाचित् बाणानें या पुराणाची नक्कल केली असेल!

आपल्या दोघांमध्यें दुर्विनीत काम कलहबीज पेरील हें ओळखून त्यांनीं हे उद्गार काढले असावेत. कदाचित् दुसरेंच एकादें अरिष्ट त्यांच्या दिव्य दृष्टीला दिसलें असेल. कसेंहि असो. एवढी गोष्ट खरी कीं, उसासा टाकून ते मला मोठ्या गांभीर्यानें, प्रेमानें, कळकळीनें किंबहुना काकुळतीनें ह्मणाले 'गभस्तिगति, जोंपर्यंत या आश्रमांत तूं ब्रह्मचारी आहेस तोंपर्यंत हा विचार अजीबात सोडून देण्याचा प्रयत्न कर.'

'परंतु विद्या समाप्त झाल्यावर मीं पुढें कसें वागावें? एकीकडे मित्र धौम्याचें प्रिय करावेंसें वाटतें; ग[illegible] मला दुसरीकडे नेते.'

'गभस्तिगति,' कुलपति ह्मणाले 'स्त्री जी करावयाची ती स्वतःच्या सुखासाठीं [illegible]ावयाची का तिच्या सुखासाठीं?'

'दोघांनीं मिळून संसारशकट आनंदानें चालवावयाचा आहे.' मीं ह्मटलें.

'पण जेथें विरोध येईल तेथें कसें? तिच्या सुखाकडेच जर तुला पहावयाचें असेल, तर तिच्याकरितां तूं स्वसुखत्याग केला पाहिजेस.'

'तिला दुःख देऊन मी सुख भोगीन असें मला वाटत नाहीं.'

'तिला सुख व्हावें अशी जर तुला इतकी इच्छा आहे, तर तुझ्याशीं विवाह करून तिला अधिक सुख होईल का धौम्याशीं, याचा नीट विचार करून पहा. कोणाशीं विवाह केला असतां तिला अधिक सुख होईल असें तुला वाटतें?'

यावर मी कांहींच बोललों नाहीं. उत्तर मिळालें नाहीं, असें पाहून ते ह्मणाले 'गभस्तिगति, तुझ्यापेक्षां धौम्यावर तिचें अधिक प्रेम आहे, अशी तुला शंका येते, हेंच ना तुझ्या मौनाचें कारण?'

'होय.' मीं खिन्नतापूर्वक ह्मटलें.

'तिच्या सुखाकडेच जर तुला पहावयाचें असेल,' ते ह्मणाले 'तर तूं हा नाद सोडून दिला पाहिजे. गभस्तिगति, चांगला विचार

कर व विकारवश होऊं नको. मीं तुह्मांला जो बोध केला आहे, त्याला साजेसें वर्तन कर. इन्द्रियांचें दमन करण्यांत खरें पौरुष आहे. पशूंप्रमाणें कामवश होऊं नको. या कामाच्या पायीं तुह्मी बालमित्र वैरी होऊं नका. या कामापुढें स्नेह नाहीं, मैत्री नाहीं, गुरु नाहींत, लाज नाहीं, लज्जा नाहीं, भीति नाहीं, असें जें ह्मणतात तें खोटें आहे, हें आपल्या वर्तनानें दाखवा.' त्यांचा हा उपदेश ऐकून मीं त्यांनां ह्मटलें ' मीं कसें वागावें, हें मला आपणच सांगावें. मी त्याप्रमाणें वागेन.'

ते ह्मणाले 'गभस्तिगति, तूं आपल्या मनाशींच विचार कर.'

असें त्यांनीं ह्मटल्यावर मी त्यांच्या उटजांतून बाहेर पडलों आणि आपल्या पर्णकुटींत येऊन या गोष्टीचा विचार करीत राहिलों. विचार करतांकरतां मला स्पष्ट दिसून आलें कीं, तुलाच तिनें वरावें, हें उचित आहे. तुझी बुद्धि माझ्यापेक्षां अधिक तीक्ष्ण आहे. तुझ्यापेक्षां मीं अधिक ग्रंथ वाचले आहेत; पण तुझी कल्पकता, तुझी मार्मिकता, माझ्यामध्यें नाहीं, हें मला विचारान्तीं दिसून आलें. तुझा स्वभाव अधिक आनंदी व उत्साही आहे, तूं रसिक आहेस, तुझ्या अंगांत मोहकता आहे. माझी बुद्धि धर्माभ्यासानें जड झाली आहे व माझा स्वभाव बराच उदास झाला आहे. माझ्या अंगांत तुझें धाडस नाहीं व तुझी कर्तृत्वशक्ति नाहीं. तूं क्रीडनांत चपळ आहेस तितकाच बुद्धीनेंहि चलाख आहेस. तुला विनोद व थट्टामस्करी जितकी प्रिय आहे, तितकें तुझें मनहि निष्कपट व कोमल आहे. तुझ्या विनोदांत माधुर्य व चटकदारपणा असून त्यांत विष नसतें. मला विनोद करतां येत नाहीं व हास्य, क्रीडा, नर्मभाषण इत्यादि मला विशेष प्रियहि नाहींत. सुलोचना तरुण आहे, क्रीडनप्रिय व विनोदप्रिय आहे. तिला काव्याची वगैरे आवड आहे. तुझ्यावर तिचें अधिक प्रेम आहे. तेव्हां ती तुलाच मिळावी

हें योग्य आहे. तुमचा दोघांचा विवाह सर्व दृष्टीनें उचित व आनंददायक आहे. धर्मविधि श्रद्धेनें जसा पावन होतो, वीर जसा विजयश्रीनें अधिक तेजस्वी होतो, ललितार्थ मधुरगीतीनें जसा अधिक आनंद-दायक होतो, वसंत वनश्रीनें जसा अधिक मनोहर होतो, तसा प्रिय मित्रा, तूंहि सुलोचनेच्या संगतींत अधिक तेजस्वी, अधिक पावन आणि अधिक मोहक होऊन सर्वांनां आनंद देत रहावेंस हीच माझी इच्छा आहे. मित्रा धौम्या, विद्या संपूर्ण झाल्यावर तूंच जरत्कारुगुरूंकडे जा व तिची मागणी कर. मीं आजपासून तो विचार सोडून दिला. तुझ्यामाझ्यामध्यें द्वेषभाव उत्पन्न होण्याचा प्रसंग आला होता, पण कुलपतींच्या उपदेशानें व आशीर्वादानें तो प्रसंग टळला! मित्रा धौम्या, तुला हा निश्चय सांगितल्यामुळें माझ्या मनाला जें स्वास्थ्य वाटत आहे व जो आनंद होत आहे त्याचें काय वर्णन करूं? सुलोचनेनें तुला माळ घातल्यावर तुला जो आनंद होईल, तितका आनंद मला आतांच होत आहे!'

गभस्तिगतीचें हें भाषण मी स्वस्थपणें ऐकून घेत होतों. मी तरी मध्यें काय बोलणार? मला अनुकूल असलेला त्याचा निश्चय ऐकून आणि त्यानें केलेली माझी स्तुति ऐकून मला साहजिकपणेंच आनंद झाला; पण त्याबरोबर माझी मला लाज वाटूं लागली. मी त्याच्या स्तुतीला पात्र नव्हतों, हें एक, व जरी असलों, तरी त्याच्या निरभिमानतेपुढें व दिव्य स्वार्थत्यागापुढें माझ्या बुद्धिमत्तेची काय योग्यता आहे, असें मला वाटूं लागलें. त्याचें इन्द्रियदमन, त्याची निरभिमानता व त्याचा तो परसुखार्थ केलेला पवित्र निश्चय पाहून मी आपल्या मानवी मित्राशीं बोलत आहें का एखाद्या दिव्य पुरुषाशीं बोलत आहें याची मला क्षणभर भ्रांति उत्पन्न झाली. मी जागा आहें

का स्वप्नांत आहें, याची सुद्धां मला क्षणभर शंका आली! 'एवढें निःस्वार्थ प्रेम असणें शक्य आहे काय?' असा माझ्या मनांत विचार आला. मी शून्य दृष्टीनें पहात स्तब्ध राहिलों. काय बोलावें हें मला सुचेना. हें पाहून तो ह्मणाला 'मित्रा, मी तुजजवळ जें बोललों, तें तुला खरें वाटत नाहीं का? गुरुजींच्या पवित्र चरणांचें स्मरण करून मी तुला अंतःकरणपूर्वक सांगतों कीं, सुलोचनेला तूंच योग्य आहेस. तिचा तुझ्याशींच विवाह व्हावा, अशी माझी इच्छा आहे. नलाप्रमाणें मी तुझें दूतकर्म करण्यासहि तयार आहें. काममूढ इन्द्राप्रमाणें तूं मला हें काम सांगणार नाहींस, ही गोष्ट निराळी; पण तूं सांगितलेंस तर या कामीं तुझें दूतकर्म करण्यासहि मी तयार आहें. तूं आणि सुलोचना आनंदानें राहिलांत म्हणजे मला आनंद आहे. तूं आपल्या सदाचारानें, बुद्धीनें, मार्मिकतेनें जरत्कारुगुरूंची जशी प्रीति मिळविली आहेस तशी त्यांची नातहि वरण्यास तूंच योग्य!'

हे शब्द त्यानें मनापासूनच उच्चारले, यांत शंका नाहीं. पण सुलोचनेस स्वतः होऊन दुसऱ्यास देण्याचें त्याच्या किती जिवावर येत होतें, हें माझ्या लक्षांत आल्याशिवाय कसें राहील? त्यानें माझें बुद्धिवर्चस्व कबूल केलें खरे, पण त्याची निरभिमानता, त्याचा अलौकिक आत्मनिग्रह, व त्याचें मित्रप्रेम इत्यादि गोष्टी पाहून माझें अंतःकरण त्याचेंच दास बनलें व मीं त्याला ह्मटलें 'गभस्तिगति, मी अधिक योग्य का तूं अधिक योग्य हें आपण कोण ठरविणार? मित्रा, तुला तुझ्या गुणांची पारख नाहीं. तूं फार विनयशील आहेस. मला वाटतें, तूंच तिला अधिक योग्य आहेस. धर्माला जशी विद्येची जोड मिळावी, किंवा उद्यमाला बुद्धीचें साहाय्य मिळावें, त्याप्रमाणें तिचा व तुझा संबंध सर्वांनां अभिनन्दनीय होईल. सुस्वभावास सुरूपता

ही सहचरी मिळाली असतां जसा लोकांनां आनंद होतो, तसा सुलोचना तुला सहधर्मचारिणी मिळाली असतां मला आनंद होईल हें सत्य समज.'

असें मी बोललों, परंतु तो आपला आग्रह सोडीना. मी ह्मणे कीं, 'जरत्कारुगुरूंकडे जाऊन आपण दोघांनीं एकाच समयीं मागणी करावी, व त्यांनां आणि सुलोचनेला जो प्रिय वाटेल, त्याला भाग्यवान् समजून दुसऱ्यानें आपला प्रेमाग्रह सोडून द्यावा, ह्मणजे कोणाकडेच दोष राहणार नाहीं.' परंतु तो माझें ह्मणणें मुळींच ऐकून घेईना. 'माझा एकदां निश्चय झाला तो झाला; तुह्मां वधूवरांचा विवाह पाहीन तोच मी सुदिन समजेन' असें तो एकसारखा ह्मणे. आमच्यामध्यें अशा प्रकारचा विलक्षण प्रेमकलह चालला असतां कलहविषयीभूत व प्रेमविषयीभूत असलेली* ती कोमलांगी सुलोचनाच आपल्या वृद्ध व अंध पितामहाचा हात धरून त्याला [illegible] कर्मे करण्यास नदीवर घेऊन जातांना आह्मांला दिसली. आह्मांला पाहून ती लज्जान्वित झाली व मान खालीं घालून चालूं लागली. तिच्या लाजेनें आह्मींहि आपला कलह तेथेंच ठेवून आपआपल्या कामास लागलों.

इति श्रीपाराशरपुराणे प्रेमयज्ञो नाम चतुर्थोऽध्यायः समाप्तः ।

शुभं भवतु ॥

---

* 'कलहप्रेमविषया' असे मूळ शब्द आहेत.

# अध्याय पांचवा.

## वरशोधनाज्ञा.

श्रीगणेशाय नमः। धौम्यमुनि पुढें ह्मणाले 'एक दिवस वृद्ध जरत्कारु-गुरूंनीं आपल्या नातीला जवळ बोलावलें व प्रेमानें ह्मटलें 'बाळे सुलोचने, मी आतां अंध आहें हें तूं पाहतेसच आहेस. मला हा आश्रम सोडून जाणें शक्य नाहीं. तेव्हां सावित्रीप्रमाणें तूंच आपला पति पाहून ये ! तूं या पवित्र आश्रमांत वाढलेली आहेस व तूं सावित्रीसारखीच सदाचारप्रिय आहेस. तूं भलत्या मनुष्याला माळ घालावयाची नाहींस अशी माझी खात्री आहे. तेव्हां तुला जो वर योग्य वाटत असेल, त्याचें नांव मला कळीव ह्मणजे मी त्याच्याशीं तुझा यथाविधि विवाहसंबंध जुळवून देईन.'

पितामहाचें हें भाषण ऐकून घेऊन सुशील सुलोचना ह्मणाली ' आजोबा, मला विवाह कर्तव्य नाहीं; मला तुमची सेवा करावयाची आहे. मीं विवाह केल्यास तुमची सेवा कोण करील? आजोबा, मी विवाहबंधन स्वीकारून पतिसेवा करूं लागल्यें ह्मणजे मी किती केलें तरी तुमची हेळसांडच होईल. त्यापेक्षां लग्न न केलेलेंच बरें. लहानपणीं तुह्मीं मला इतकें प्रेमानें वागविलेंत, विद्या शिकविलीत व विनीत मार्ग दाखवून दिलात, त्याची उतराई तुह्माला या वयांत सोडून देऊनच मी होऊं काय? आजोबा, मला हा आश्रम सोडावयाचा नाहीं. तुमच्या सेवेशिवाय मला अन्य कर्तव्य नाहीं.''

तिचें हें अकृत्रिम स्नेहाचें उदात्त भाषण ऐकून तिच्या पितामहास साहजिकपणेंच मोठा आनंद झाला; पण त्यांनीं ' हा भलता आग्रह

धरूं नको; माझे छात्र माझी सेवा करतील; तूं आतां विवाहयोग्य झाली आहेस; या वयांत तुला माझी सेवा करण्यास मी लावलें तर मला पाप लागेल,' इत्यादि गोष्टी तिला सांगितल्या; पण तिनें आपलें ह्मणणें सोडलें नाहीं.

इति श्रीपाराशरपुराणे वरशोधनाज्ञा नाम पंचमोध्यायः समाप्तः।
शुभं भवतु ॥

## अध्याय सहावा.

### सुलोचनाविवाह.

कांहीं दिवसांनीं जरत्कारुगुरूंनीं सुलोचनेला पुनः बोलावलें, व ह्मटलें 'बाळ सुलोचने, इतके दिवस मी तुला सांगत आहें, पण तूं माझें ऐकत नाहींस हें उचित नव्हे. बाळे, माझी सेवा कोणीहि करील. त्याची तुला काळजी नको. माझा आतां अंत जवळ आला आहे; माझ्या देखत तुझा विवाह झाला ह्मणजे माझ्या जिवाला समाधान होईल. तुला या आश्रमांतीलच एकादा वर पाहून देण्याचा माझा विचार आहे. परवां कुलपतींचें व माझें याविषयीं थोडेंसें संभाषण झालें. तुझें लवकरच लग्न व्हावें अशी त्यांची देखील इच्छा आहे.'

'आजोबा, मी तुह्माला सोडून जावयाची नाहीं. हा आश्रम व तुमचें हें उटज सोडून न जातां मला विवाह करितां आला तरच मी विवाह करीन!'

'आपल्या आश्रमांतील गभस्तिगति व धौम्य, हे विद्या संपूर्ण झाल्यावर तुझी मागणी करणार आहेत, असें मला समजलें आहे. तर त्यांपैकीं कोण तुला प्रिय आहे, हें मला सांग.'

यावर ती तन्वंगी कांहींच बोलली नाहीं. ती काय सांगणार? तिच्या हृदयांत अनेक अंतःकलह चालले होते. एकीकडे तर प्रिय व वृद्ध पितामहाकरितां अविवाहित राहण्याची उत्कट इच्छा, व दुसरीकडे विवाहाची अनिवार इच्छा. बरें, विवाह केल्यावरहि पतिसमवेत त्या उटजांतच रहावयाचें असें ठरविल्यास हा अंतःकलह थोडासा शांत होईल. पण मी व गभस्तिगति या दोघांमध्यें पति ह्मणून कोणाला

वरावें या प्रश्नानें तिचें हृदय द्विधा होण्याच्या बेतांत आलें. गभस्तिगतीवर तिचें खरें, सात्त्विक प्रेम होतें, आणि तें योग्यहि होतें; कारण त्याचें शीलच तसें आदरणीय होतें. पण माझी विनोदप्रियता, माझी उल्हासवृत्ति, माझें बुद्धितेज, माझें धाडस इत्यादि गुणांनीं तिचें राजस प्रेम मीं आकर्षून घेतलें होतें. गभस्तिगति हा तिला सूर्यासारखा वंदनीय होता; पण मी तिला चंद्रासारखा कमनीय अथवा रमणीय वाटत होतों. अशी ही स्थिति असल्यामुळें वाऱ्यानें इतस्ततः हेलकावे खाणाऱ्या लतेप्रमाणें तिचें मन त्या वेळीं दोलायमान होत होतें, तेव्हां ती कोणाला पसंत करावयाचें याविषयीं काय उत्तर देणार ?

मुनींचीहि अवस्था बहुतेक तिच्यासारखीच झाली होती. सांसारिक मनुष्याची मति जशी एकादवेळेस 'धर्म' व 'अर्थ' या पुरुषार्थासंबंधानें गोंधळून जाते, त्याप्रमाणें त्या मुनींची या वेळीं स्थिति झाली; किंवा त्यापेक्षांहि त्यांची स्थिति अधिक व्याकुल झाली असेल. कारण आह्मी दोघेहि त्यांनां 'धर्मा'सारखेच प्रिय होतों. कोणाला ते पसंत करणार? कोणाचें भाग्य अधिक होतें ? आह्मीं दोघांनीं एकाद्या कवितेचे दोन निरनिराळे अर्थ सुचविले असतां किंवा दोन निरनिराळे पाठभेद दाखविले असतां त्यांची चर्या अनिश्चयामुळें कशी व्याकुळ व्हावयाची, हें मला अद्यापि स्मरत आहे. मग आपल्या प्रिय नातीच्या विवाहासारख्या महत्त्वाच्या व जिव्हाळ्याच्या प्रश्नासंबंधानें त्यांचें हृदय कसें झालें असेल, याची कल्पनाच केलेली बरी! गोष्टीचा पाल्हाळ लावण्यांत अर्थ नाहीं, ह्मणून त्यांचा निकाल मी एकदमच सांगून टाकतों. अर्थभेद किंवा पाठभेद आम्हीं दोघांनीं सुचविले असतां ते बहुधा माझाच अर्थ व पाठ मान्य करीत; त्याप्रमाणें त्यांनीं या बाबतींतहि माझ्या सुदैवानें मलाच पसंत केलें

व त्या गुरुजनभक्त सुलोचनेनेंहि त्यांच्या ह्मणण्यास मान दिला होता. ही त्यांच्या उटजांतील गोष्ट मला स्पष्टपणें अर्थात् त्या वेळीं कळलेली नव्हती. मी त्या वेळीं संशयांत तळमळत होतों. समाप्तविद्य झाल्यावर व सर्वोपकारक्षम गृहस्थाश्रमांत प्रवेश करण्यास कुलपतींनीं आह्मांस लवकरच आशीर्वादपूर्वक अनुज्ञा दिल्यावर मी जरत्कारुगुरूंचा आशीर्वाद घेण्याकरितां गेलों असतां त्यांनीं मला आशीर्वाद दिला, व बोलतां-बोलतां 'माझ्या सुलोचनेनें तुला मनानें वरिलें आहे' असें त्यांनीं मला सांगितलें व विधिपूर्वक हा विवाह लवकरच जुळवून यावा, अशी इच्छा दर्शविली. यापुढें मी तरी काय बोलणार? 'मी आपल्या आज्ञेबाहेर नाहीं; पण मला यासंबंधानें कुलपतींची व वडिलांची अनुज्ञा घेतली पाहिजे,' असें सलज्ज होऊन नम्रतेनें मीं ह्मटलें. पुढची हकीकत थोडक्यांतच सांगावयाची ह्मणजे गुरु जसा सच्छिष्याला आनंदानें विद्या देतो, त्याप्रमाणें त्यांनीं आपली पुत्रकन्या आश्रमाग्निसमक्ष विधिपूर्वक मला अर्पण केली.

विवाह झाल्यावर कुलपतींचा आशीर्वाद घेण्यास मी पुनः त्यांच्या-कडे गेलों, व गुरुदक्षिणा काय द्यावी असें त्यांनां नम्रतेनें विचारलें. ते ह्मणाले 'बाल धौम्य, मीं दिलेल्या विद्येचें सदाचरणानें तूं सार्थक केलेंस ह्मणजे मला माझी गुरुदक्षिणा पोंचली.'

'आपल्या सदुपदेशाप्रमाणें वागून विद्येचें सार्थक करण्याचा मी प्रयत्न करीन' असें मीं विनयपूर्वक त्यांनां अश्वासन दिलें. पुढें बोलतां-बोलतां 'हा प्रिय आश्रम—आपली पवित्र संगति—सरस्वतीदेवीची ही उज्ज्वल भूमि सोडून जाण्याचें माझ्या जिवावर येत आहे,' असे उद्गार माझ्या मुखांतून सहजगत्या निघाले.

'मग तुझी काय इच्छा आहे?' त्यांनीं विचारिलें.

' येथेंच अध्ययन व अध्यापन करीत रहावें अशी उत्कट इच्छा आहे. पण—

'पण, काय?'

'पण मीं विवाह केल्यामुळें हा ब्राह्मणोचित पवित्र चरित्रक्रम माझ्या नशिबीं नाहीं.'

माझे निराशेचे शब्द ऐकून ते ह्मणाले 'तुझी खरीच इच्छा असली तर तुझ्या या विवाहानें या कामांत कांहीं अडचण येणार नाहीं. गृहस्थाश्रमी मनुष्याला व स्त्रियांनां आश्रमांत घेऊं नये, हा नियम खरा. पण प्रत्येक नियमाला अपवाद असतो. सुलोचना जन्मापासून या आश्रमांत होती व तूंहि बरींच वर्षे येथेंच होतास. तुमची दोघांची येथेंच राहण्याची इच्छा आहे. तेव्हां तुह्मांला निघून जाण्यास सांगणें कठीण नाहीं का? तुह्मी आह्मांला स्वतःच्या अपत्यांप्रमाणें वाटतां; तुह्मांला आपल्या घरांतून मी कसा घालवून देऊं? शिवाय, आतां तूं जर या सुलोचनेला घेऊन गेलास तर जरत्कारुमुनींचें कसें होईल? तूं त्यांच्याच उटजांत राहिलास तर त्यांचें अध्यापनकार्य करूं शकशील, व सुलोचनेला त्यांची सेवा करतां येईल. जरत्कारुगुरूंनां सुख देणें हें तुमचें कर्तव्य आहे. मी तुमच्या कर्तव्याच्या आड येणार नाहीं. तुझ्यासारखा अध्यापक गृहस्थाश्रमी असला, तरी तो मला मान्य आहे.'

इति श्रीपाराशरपुराणे सुलोचनाविवाहो नाम षष्ठोध्यायः समाप्तः।

शुभं भवतु।

## अध्याय सातवा.

### आश्रमांतील संसार.

श्रीगणेशाय नमः । धौम्य ह्मणाले 'गभस्तिगति हा आश्रमांतच गुरु झाला. तो आतां पूर्वीपेक्षां उद्यमशील व ग्रंथसंगतिप्रिय झाला. त्यानें कठीण ग्रंथ बालकांनां सुबोध व्हावेत ह्मणून अनेक टीका लिहिल्या. व्याकरणावर त्यानें एक महाभाष्य केलें आहे, हे नारदा, तुला विदित असेलच.

आमच्या दोघांची अध्ययनअध्यापनाची महत्त्वाकांक्षा तर पूर्ण झाली, व आमचा काळ आनंदांत जाऊं लागला. विशेषतः मला तर हें सर्व जग आनंदमय व प्रेममय दिसूं लागलें. सुशील आणि सुविनीत पत्नी ज्यांनां मिळते ते खरोखरच धन्य होत. माझ्या पत्नीच्या संगतींत मीं त्या आश्रमांत जीं तीन वर्षें घालविलीं, तीं कशीं व किती आनंदांत गेलीं, याचें वर्णन, नारदा, मी आतां करीत नाहीं.

लहानलहान बालकांचें माझ्या पत्नीवर फारच प्रेम होतें. ती त्यांनां बहिणीप्रमाणें किंवा आईप्रमाणें वाटत असे. कोणी छात्र रोगसंत्रस्त झाल्यास त्याची ती प्रेमपूर्वक शुश्रूषा करीत असे. आपल्या उटजांत पथ्यकर व रुचकर पदार्थ तयार करून ते खाण्याचा त्यांनां त्यांच्या आईसारखाच ती आग्रह करीत असे; आणि हें सर्व अगदीं साहजिकपणें व मनापासून ती करी. एकदां एक लहान नऊ वर्षांचा मुलगा आश्रमांत आल्याबरोबर संनिपातानें आजारी पडला. माझ्या पत्नीनें त्याची अंतःकरणपूर्वक व प्रेमानें इतकी जोपासना केली कीं, त्याला ती आईसारखीच वाटूं लागली व तिचें नांव त्याला विदित नसल्यामुळें

तो तिला आईच ह्मणूं लागला, व तेव्हांपासून तिचें नांव ' आई ' असेंच पडलें. तिच्यावर लहान मुलांची इतकी भक्ति होती कीं, त्यांनां एकादवेळेस जर उत्तम पक्क आम्रफळ सांपडलें, किंवा उत्तम बदरीफळें दिसलीं, किंवा कांहीं सुंदर पुष्पें आढळलीं, तर ते तिच्याकरितां मुद्दाम घेऊन येत असत. लहान मुलांनां वन्यफळें वगैरे दिसलीं कीं, तीं फळें स्वतः खाऊन टाकण्याची त्यांनां प्रबल इच्छा होते; पण त्या आश्रमांतील लहान मुलें चांगलीं फळें वगैरे दिसलीं कीं, तीं स्वतः न खातां कुलपतींनां, गुरूंनां किंवा गुरुपत्नींनां मोठ्या प्रेमानें देत असत. ही गुरुजनभक्ति एकादवेळेस फारच उत्कट रीतीनें दिसून येई.

पण या गोष्टींचा आतां पाल्हाळ कशाला लावूं ? माझा सांगण्याचा हेतु एवढाच होता कीं, माझ्या सहधर्मचारिणीच्या संगतींत व आश्रमांतील प्रेमळ, निष्कपट व गुरुजनभक्त छात्रांच्या सहवासांत माझा काळ फारच सात्त्विक सुखांत व आनंदांत गेला अध्ययन-अध्यापनाशिवाय दुसरा व्यवसाय नाहीं; पत्नी सुस्वरूप, नम्र, सुशील, कोमलहृदय व प्रेमळ; आपणांस पूज्य असलेल्या गुरुजनांचें तसेंच आपल्या सच्छिष्यांचें प्रेम, इत्यादि गोष्टी थोड्याजणांच्याच भाग्यांत असतात. त्या वेळीं जो आह्मांला आनंद होत होता, त्याच्यापुढें ब्रह्मानंदहि तुच्छ आहे, असें मला एकादवेळेस वाटतें. आह्मांला त्या वेळीं त्या आश्रमांत दुःखाचें व शोकाचें ज्ञान काव्यग्रंथाव्यतिरिक्त होण्याचा प्रसंग विरळा येत असे. तेथें अश्रुपात होमधूमानें व्हावयाचा; वध यज्ञांतच; द्वेष दुष्कर्मांचाच; आसक्ति सन्मार्गावरच; स्खलन क्रीडनांतच; कलह काव्यार्थाविषयींच आणि अभिमान विद्येविषयीं व पवित्र चारित्र्याविषयींच; या पवित्र-रम्य स्थानाचा व स्थितीचा अनुभव एक दिवस जरी मिळाला तरी तो मनुष्य बराच भाग्यवान् आहे, असें मी समजतों !

पण नारदा, दैवाला माझा आनंद सहन झाला नाहीं, असें दिसतें. बालपणाची माझी ब्रह्मजिज्ञासा लयास गेली ह्मणून मला शासन ह्मण, अथवा, दैवास माझें सत्त्व पहावयाचें होतें असें ह्मण; माझी ही दिव्य समाधानाची व उच्चत्तम आनंदाची स्थिति लवकरच विलयास गेली !

इति श्रीपाराशरपुराणे आश्रमसांसारिको नाम सप्तमोऽध्यायः समाप्तः ।

शुभं भवतु ।

# अध्याय आठवा.

## राजकोप.

श्रीगणेशाय नमः । धौम्य पुढें ह्मणाले ' माझे वडील व श्वशुर हे मध्यन्तरीं कालवश झाले होते, हें मीं मागेंच सांगणें जरूर होतें. पण तें गोष्टीच्या ओघांत राहून गेलें. मातेचें दुःख विसरत चाललों होतों, तोंच प्रिय पित्याच्या व श्वशुराच्या मरणाचें दुःख ! परंतु हेंहि दुःख मी कालान्तरानें विद्याभ्यासंगांत व पत्नीसमागमांत विसरून गेलों. या पापामुळेंच कीं काय, माझे सुखाचे दिवस लवकरच संपुष्टांत आले.

या सुमारास अग्निमित्र राजा मरण पावला होता व त्याच्या मागून त्याचा पुत्र दिङ्नाग * हा राज्यावर अधिरूढ झाला. नारदा, या दिङ्नागाचें चारित्र्य किती वाईट होतें, व त्यानें प्रजेला किती छळलें, हें तुला विदितच आहे. पित्यानें मिळविलेला सर्व अर्थकोश त्यानें संपवून टाकला. नंतर तो मांडलिक राजांकडून व प्रजेकडून अनेक प्रकारें द्रव्य उकळूं लागला. गरीब प्रजा काय करणार ? जो जो कर तो बसवी, तो तो देणें प्रजेस प्राप्त होतें. दिङ्नाग राजाचें लक्ष्य ऋषींचे आश्रमांकडेहि गेलें. तपोधन ऋषींचें फलमूलधान्यादिक ऐश्वर्य त्याला पाहवलें नाहीं. धान्याचा षष्ठांश भाग राजाचा आहे, असें शास्त्र

---

* मूळांतील कांहीं श्लोक येथें गाळलेले आहेत. त्यांमध्यें दिङ्नाग राजाच्या पूर्वजांच्या नामनिर्देशाशिवाय महत्त्वाचें असें कांहीं नाहीं. इतिहाससंशोधनाच्या दृष्टीनें मात्र ते फार महत्त्वाचे आहेत. कारण, त्यांतील यादीवरून दिङ्नागाच्या खापरपणज्याच्या खापरपणजाचें नांव 'शशिपद' असें नसून '. शपद' असें होतें, हा अत्यन्त महत्त्वाचा असा शोध लागतो.

भाषान्तरकर्ता.

असल्यामुळें तो भाग किंवा त्याचें मूल्य त्याच्याकडे आह्मी पोंचतें करीत होतों. परंतु त्या दुष्ट राजाची धनलालसा एवढ्यानें तृप्त झाली नाहीं. धान्यषष्ठांशभागाबरोबर तो फलषष्ठांशभागहि मागूं लागला.

त्या नृपतीच्या उपाध्यायाशीं याविषयीं शास्त्राधाराची वगैरे चर्चा करण्याकरितां व तडजोड करण्याकरितां कुलपतींनीं गभस्तिगतीस नगराकडे पाठविलें. धूर्त व कपटी दिङ्नागराजानें त्याचा मोठा आदरसत्कार केला, व एका कनिष्ठ उपाध्यायाच्या द्वारें त्याच्याकडे दशसहस्र निष्क पाठवून दिले. 'हे दशसहस्र निष्क ह्मणजे लांच ह्मणून दिलेले आहेत' असें ओळखून गभस्तिगतीनें ते घेण्याचें नाकारलें, व 'आह्मी आश्रमवासी मुनि आहोंत; आह्मी नगराबाहेरच्या एका देवालयांत राहतों. आमच्या छात्रसेवकांकरितां पुरे इतकी ओदनादि भोजनसामुग्री दिली ह्मणजे आमचें आदरातिथ्य झालें,' असें सांगून ऐश्वर्याचा व ऐषआरामाचा पाहुणचार न घेतां तो नगराबाहेरच राहिला. असो.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं राजाचे एक उपाध्याय गभस्तिगतीकडे गेले, व शास्त्रार्थ करूं लागले. त्यांनीं स्वतःस अनुकूल असे बनावट श्लोक करून ते पोथ्यांमध्यें मुद्दाम घुसडून दिले होते. या बनावट पोथ्या दाखवून 'राजा हा फलषष्ठांशभागाचाहि अधिकारी आहे,' असें गभस्तिगतीला कबूल करावयास त्यांनीं लावलें. गभस्तिगति बुद्धिमान् व विद्वान् खरा; व हे श्लोक प्रक्षिप्त असावेत असाहि त्याला संशय आला होता खरा; परंतु उपाध्यायांनीं तशाच अनेक पोथ्या जेव्हां दाखविल्या तेव्हां 'हे श्लोक प्रक्षिप्त आहेत असें ह्मणणें ह्मणजे स्वार्थबुद्धीचें लक्षण होय,' असें त्या सरळ व सात्त्विक गभस्तिगतीला वाटलें, व त्यानें उपाध्यायांचा शास्त्रार्थ मान्य केला, 'फल' ही लवकर विनाश

पावणारी वस्तु असल्यामुळें त्यांचा षष्ठांशभाग न देतां त्याबद्दल द्विसहस्र निष्क आश्रमाकडून राजाला प्रतिवर्षी देण्यांत येतील, असें त्यानें कुलपतींच्या वतीनें राजापाशीं कबूल केलें.

आश्रमांत तो परत आल्यावर आह्मांला ही सर्व हकीकत कळली. कुलपतींनीं 'ते श्लोक आपलें ज्ञान व शील विकणाऱ्या अशा स्वार्थसाधु उपाध्यायांनीं मुद्दाम पोथ्यांमध्यें घातले,' असें त्यास सांगितलें; परंतु त्यांनीं त्याला दोष दिला नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यानें कबूल केल्याप्रमाणें प्रतिवर्षी द्विसहस्र निष्क पाठविण्याचें त्यांनीं ठरविलें, व त्याप्रमाणें एका वर्षाचे पाठवूनहि दिले. परंतु अग्नीला हविर्भाग दिला ह्मणजे जसा तो अधिकच वृद्धिंगत होतो, तसा राजा दिङ्नागाचा लोभ आतां अधिकच वृद्धिंगत झाला व तो चतुःसहस्र निष्क मागूं लागला. तेव्हां यासंबंधानें राजाशीं बोलणें अवश्य करितां कुलपतींनीं या खेपेस मला पाठविलें.

राजा दिङ्नागानें मलाहि धन वगैरे देऊन वश करून घेण्याचा प्रयत्न केला; परंतु मजजवळ असला कपटव्यवहार चालावयाचा नाहीं, हें त्यांना लवकरच कळून आलें. उपाध्यायांनीं माझ्याशीं शास्त्रचर्चा सुरू केल्यावर त्यांचें कापट्य मीं त्यांच्या जेव्हां पदरांत घातलें, तेव्हां त्यांनीं तो ऊहापोह कांहीं तरी निमित्त करून सोडून दिला, व शास्त्रार्थ करण्याकरितां त्यांनीं मला राजासमोरच बोलाविलें. 'राजाच्या पोथ्या बनावट आहेत' असें राजाच्या समोर बोलण्याचें मी साहस करणार नाहीं, असें त्यांना वाटत होतें; परंतु मीं आपलें ह्मणणें राजासमोरहि विनयानें पण स्पष्टपणें मांडलें. राजा संतप्त झाला व 'आमच्या राज्यांतील सर्व पोथ्या खोट्या व तुमच्या आश्रमांतील तेवढ्या खऱ्या!' असें उपरोधिक स्वरानें म्हणाला, व द्विसहस्र निष्क देण्याचें आधीं कबूल करून आतां आपलें

वचन मोडण्याची इच्छा धरण्याबद्दल ऋषींनां दोष देऊं लागला, आणि ‘असला दुराग्रह धरल्यास आश्रम उध्वस्त करून टाकीन’ असें तो पर्यायानें सुचवूं लागला. या धमकीमुळें मी फार क्रुद्ध झालों व ‘खोटे श्लोक लिहून भोळ्या ऋषींनां फसविणारा राजा मात्र खरा व आश्रमवासी ऋषि तेवढे खोटे!’ असें त्याला उलट उत्तर दिलें. हा वाक्कलह वाढत जाऊन राजा संतापानें लाल झाला व त्यानें आपल्या परिचारकांनां मला धरण्यास सांगितलें. राजाचे हे शब्द ऐकून माझे शिष्यहि क्षुब्ध झाले व त्यांनां भान न राहिल्यामुळें त्यांनीं मला धरण्यास येऊं पाहणाऱ्या एका परिचारकाला हातांतील यष्टि मारून खालीं पाडलें. ‘मारामारी करूं नये’ ह्मणून मी त्यांनां सांगूं लागलों व त्यांचें नियमन केलें. इतक्यांत राजाच्या दोघां परिचारिकांनीं पाठीकडून येऊन मला पकडलें. मला हस्तपादबद्ध पाहून माझे शिष्य अतिक्रुद्ध झाले, व मला सोडविण्याकरितां ते प्रयत्न करूं लागले; परंतु राजकिंकराच्या तीक्ष्ण तलवारीपुढें त्यांचें काय चालतें? ‘शांत व्हा’ असें मी त्यांनां जों सांगत आहें, तोंच ते तलवारींच्या धारेला वश होऊन खालीं पडलेले मीं पाहिले!

राजानें मला सेनापतीच्या स्वाधीन केलें व नगराबाहेरच्या किल्ल्यांत बंदोबस्तानें ठेवण्यास सांगितलें. दिङ्नागानें मला किल्ल्यामध्यें बंदिवासांत ठेवलें खरें; पण तेथें मला तो हलकेहलके मोठ्या सौम्यतेनें व आदरानें वागवूं लागला. चतुःसहस्र निष्क देण्याचें व राजाविरुद्ध कुलपतींस कांहीं न सांगण्याचें मीं कबूल केल्यास माझा बंदिवास चुकेल, असें राजानें आपल्या हस्तकांकडून मला सुचविलें. ‘राजाच्या इच्छेप्रमाणें चालल्यास राजा तुह्माला वस्त्रालंकार वगैरे पारितोषिक ह्मणून देईल,’ असें मला एकीकडून सांगण्यांत येत असे, व ‘हट्ट धरल्यास जिवास मुकावें लागेल,’

असें दुसऱ्या हस्तकांकडून मला सुचविण्यांत येत असे. राजनीतींत कपट पाहिजेच, असा विचार करून मी राजाच्या मसलतीस बाह्यत: कबूल झालों. कुलपतींकडून दरवर्षी चतु:सहस्र निष्क देवविण्याचें मीं राजाजवळ कबूल केलें. आश्रमांत जिवानिशीं परत गेल्यावर मग कुलपतींशीं काय बोलावयाचें हें आपल्या हातांत आहे, असा मीं विचार केला होता. असो.

सुचविलेल्या सर्व गोष्टीस मी कबूल आहें, हें ऐकून राजा दिङ्नागाला अर्थात् आनंद झाला; पण, नारदा, तो दुष्ट राजा पूर्ण नीतिनिपुण! माझ्या मनांत कावा असावा, असा त्याला संशय आला. जीव वांचविण्याकरितां तात्पुरतें मीं सोंग घेतलें आहे, असा त्यानें तर्क केला. मला जिवाची अधिक आशा आहे, का आश्रमाचा अभिमान अधिक आहे, याची परीक्षा पाहण्याचा त्यानें विचार केला, व एक दिवस त्या इंगितज्ञ राजानें माझ्या समोर कुलपतींची निंदा करण्यास आरंभ केला. त्याचा हेतु हा कीं, ती निंदा ऐकून माझ्या चर्येवर व माझ्या भाषणांत जर कोप दिसला तर मला आश्रमाचा अभिमान आहे, व मीं जर ती निंदा निमूटपणें सहन केली तर मी कोडगा व स्वार्थसाधु आहें, असें समजावें. त्याचा हा हेतु मीं ओळखला व चर्येवर क्रोध वगैरे कोणताहि विकार न दिसेल अशा रीतीनें मीं मनाचें नियमन केलें; परंतु दिङ्नाग राजा जेव्हां गुरूंनां अद्वातद्वा दूषणें देऊं लागला व अखेर तो माझ्या प्रिय पत्नीविषयींहि जेव्हां अनिर्वाच्य भाषण करूं लागला तेव्हां माझा क्रोध माझ्या विचारशक्तीपेक्षां बलवत्तर होऊन माझ्या मुखांतून कोपपूर्ण आवेशाचे शब्द निघून गेले!

माझे उद्गार ऐकून दिङ्नागराजा जरा हंसला. माझी परीक्षा पाहण्याकरितां त्यानें केलेली युक्ति सफल झालेली पाहून त्याला समाधान होणें

साहजिक होतें. माझी कुलपतींवर फार भक्ति आहे व निर्लज्ज व स्वार्थसाधु उपाध्यायांप्रमाणें आपल्या कार्यास उपयोगी पडण्यासारखा मी नाहीं, असें त्या नीतिनिपुण राजानें ओळखलें, व 'माझ्याजवळ तुमच्यासारख्या ऋषींचे कावे चालत नसतात ' असें तो गर्वानें ह्मणाला. 'तुमच्या मायावीपणाचें तुह्माला लवकरच शासन मिळेल,' असें तो बोलतांबोलतां ह्मणाला. त्याची ही धमकी ऐकून मी फारच संतप्त झालों, व ह्मणालों 'राजा, जोंपर्यंत हा जीव देहाच्या उपाधीनें युक्त होऊन या भूमितलावर वावरत आहे, तोंपर्यंतच तूं हाल करशील. पण स्वर्गांत कांहीं तुझा अधिकार नाहीं!' हें ऐकून दिङ्नागराजा धिक्कारपूर्वक हंसला व माझ्याकडे वळून ह्मणाला ' धौम्यर्षि, तुह्मी तप करून स्वर्गप्राप्तीचीच अपेक्षा करीत असाल, तर मी तुह्मांला एकदोन दिवसांतच स्वर्गाचा मार्ग दाखवून देतों, ह्मणजे तुमची मनःकामना लवकरच सफल होईल !' अशीं हीं कठोर व उपरोधिक वचनें उच्चारून त्या दुष्ट राजानें मोठ्यानें हास्य केलें व ' यांनां नगरबाह्य दुर्गांत नेऊन अन्नपाण्याशिवाय ठेवा ' अशी सेनापतीस आज्ञा दिली, आणि पुनः मजकडे वळून उपरोध हास्यपूर्वक तो मला ह्मणाला ' धौम्यर्षि, या उपवासमार्गानें स्वर्गप्राप्तीचें द्वार लवकरच खुलें होतें !'

दुसऱ्या दिवशीं राजाचे मुख्य उपाध्याय माझ्याकडे आले व माझ्याजवळ बसून मला हळूच ह्मणाले 'धौम्यर्षि, मी राजाचा उपाध्याय आहें. राजाज्ञेवरून मीं पोथ्यांमध्यें नवीन श्लोक घातले हें खरें आहे. स्वार्थाकरितां मी हें कर्म करण्यास तयार झालों, असें तुह्मी ह्मणाल, व त्याच्यांत थोडेंसें तथ्यहि असेल, पण या राजाची सेवा करीत राहण्यांत स्वार्थाचा फारसा संबंध नाहीं, हें सत्य माना. मीं जर या वेळीं या राजाची सेवा केली नाहीं, तर दुसरे दुष्ट उपाध्याय माझ्या स्थानीं

येतील व ते प्रजेमध्यें अधिकच अधर्म माजवितील आणि राजाच्या पापाला व प्रजेच्या दुःखाला सीमाच रहावयाची नाहीं. धौम्यर्षि, आह्माला या दुष्ट राजाचीं कृत्यें संमत आहेत, असें का तुह्माला वाटतें ?

'पण ही गोष्ट आतां सविस्तरपणें बोलण्यासारखी नाहीं. माझें आतांचें काम ह्मणजे एवढेंच कीं, तुह्माला प्राणसंकटांतून वांचवावें. या नीच दिङ्नागराजानें तुह्माला अरण्यांत नेऊन मातंगांकडून मारविण्याचा बेत केला आहे, व कांहीं तरी खोटी वार्ता पसरून तो आपल्या कपटकृत्यांवर पांघरूण घालणार आहे. मला त्याचा हा बेत समजला आहे. तेव्हां हे तीन अलंकार जवळ लपवून ठेवा व मारेकऱ्यांचें मन चातुर्यानें वळवून आपला जीव वांचवा. धौम्यर्षि, मायावी लोकांशीं प्रसंग पडला असतां सज्जनासहि मायावी बनावें लागतें, हें तत्त्व तुह्माला मीं नव्यानें सांगावयाला पाहिजे असें नाहीं. मी आतां जातों. सांगितलेली गोष्ट ध्यानांत ठेवून कालानुसार व प्रसंगानुसार वर्तन ठेवण्याचें लक्षांत ठेवा, ह्मणजे झालें !'

मीं त्यांचें बोलणें ऐकून घेतलें व त्यांनीं दिलेले तीन सुवर्णालंकारहि ठेवून घेतले. त्यांनीं ह्मटल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं तीन कृष्णवर्ण मातंगांनीं मला धरलें व माझे झोळे बांधून टाकून ते मला एका अरण्यांत उचलून घेऊन गेले. कांहीं मार्ग आक्रमून झाल्यावर त्या मातंगांशीं कांहीं तरी निमित्त करून संभाषण करण्यास मीं प्रारंभ केला. माझा स्वभाव, माझें धर्मज्ञान, माझी विद्वत्ता, माझ्यावर तो दुर्धर प्रसंग येण्याचें कारण इत्यादि गोष्टी त्यांनां समजून आल्यावर आपल्या दारुण व निर्घृण कर्मांची त्यांनां लाज वाटूं लागली. हिरण्यगर्भराजा, ते जातीनें मातंग होते. पण त्यांचेंहि हृदय माझी हकीगत ऐकून द्रवलें व मला मारणें ह्मणजे घोर पाप करणें होय असें त्यांनां वाटूं लागलें.

आपापसांत ते मसलत करूं लागले. मला न मारतांच सोडून द्यावें व 'मारलें' ह्मणून राजास खोटेंच सांगावें, असें एकानें सुचविलें.

'पण राजानें त्याचें मुंडकें घेऊन येण्यास सांगितलें आहे, त्याची काय वाट?' दुसरा ह्मणाला.

'खरेंच बा.' तिसरा ह्मणाला. 'या ब्राम्हणाचें डोकें नाहीं नेलें, तर राजा आपलेंच डोकें तलवारीनें उडवून टाकील.'

'याला एक युक्ति आहे.' पहिला मातंग ह्मणाला. 'वाटेंत कोठून तरी यवनजातीचें पुरलेलें प्रेत उकरून काढून तें मुंडकें विद्रूप करून राजाकडे आपण घेऊन जाऊं व वाटेंत अचानक आलेल्या वाघानें धौम्य ऋषींचें हें शीर विद्रूप केलें असें राजाला सांगूं ह्मणजे झालें.'

ही युक्ति सर्वांनां पसंत पडली व त्यांनीं ती मला लगेच कळविली.

'पण महाराज, एक विनंति आहे,' पहिला मातंग ह्मणाला. 'तुह्मी या राज्यांत कांहीं वर्षें येऊं नका, व दिङ्नाग राजा आहे तोंपर्यंत तुह्मी आपल्या आश्रमांतहि जाऊं नका. तुह्मी आश्रमांत गेलेत, तर ही बातमी राजाला कळल्याशिवाय रहावयाची नाहीं.'

'बरें आहे.' मीं ह्मटलें. 'तुमचें ह्मणणें न्यायाचें आहे.'

इतक्यांत दुसरा मातंग ह्मणाला 'तुह्मी जिवंत आहांत, हेंहि या राज्यांत कोणाला कळवूं नका. एकदोघांनां जरी ही गोष्ट कळली, तरी ती षट्कर्णी होऊन दूताकडून राजाला कळावयाचीच. तेव्हां जिवंत असण्याची बातमी घरीं देखील कळविणार नाहीं, असें शपथेवर वचन द्या; नाहीं तर मरणास तयार व्हा.'

'तुझें ह्मणणें खरें आहे.' तिसरा ह्मणाला. 'हा ब्राह्मण जिवंत आहे, हें याच्या आईबापांनां सुद्धां कळून उपयोगी नाहीं!''

'मला आईबाप नाहींत.' मीं दुःखानें सुस्कारा टाकून ह्मटलें. 'आणि नाहींत, ही गोष्ट एका अर्थी चांगलीच आहे. मला व्याघ्रानें मारलें, ही गोष्ट ऐकून त्यांचें हृदय फाटूनच गेलें असतें. दिङ्नागराजा आहे तोंपर्यंत मी जिवंत असल्याची बातमी कोणासहि कळूं देणार नाहीं. मला तुह्मीं वांचविलेंत, तर तुमचा जीव धोक्यांत येईल, असें मी कांहींहि करणार नाहीं.'

'देवाची शपथ घ्या.' तिसरा मातंग ह्मणाला.

'शपथेवर काय आहे ?' मी जरा स्मित करून ह्मटलें. 'पण तुमची इच्छा आहे तर या यज्ञोपवीताची व गायित्रीची शपथ घेऊन सांगतों कीं, दिङ्नागराजा गादीवर आहे तोंपर्यंत मी आश्रमांत जाणार नाहीं व जिवंत आहें, हेंहि कोणास कळूं देणार नाहीं.'

असें आमच्यांत ठरल्यावर कांहीं वेळानें त्यांनीं माझीं वस्त्रें मागितलीं. मी वस्त्रें दिल्यावर त्यांनीं तीं वाघाच्या पंजानें फाडल्यासारखीं फाडलीं व तेथील एका हरणाला मारून त्याचें रक्त त्याच्यावर शिंपडलें, व कांहीं भाग रक्तांत भिजविला. वस्त्र काढून दिल्यावर त्यांनां माझें यज्ञोपवीत दिसलें व तें मजजवळ ते मागूं लागले.

'ब्राह्मणानें हें यज्ञोपवीत काढलें तर त्याचें ब्राम्हण्य जातें.' असें मीं त्यांनां सांगितलें व याबद्दल पाहिजे तर हे तीन सुवर्णालंकार * देतों,' असें त्यांनां ह्मटलें.

---

* **त्रीन् सुवर्णानर्पयाम्यहम्।** असें मुळांत आहे. 'सुवर्ण' हा शब्द येथें 'सुवर्णालंकार' किंवा 'सुवर्णाचें नाणें' या अर्थानें योजिलेला दिसतो, का 'सुवर्ण' या नांवाचें एकादें विशिष्ट नाणेंच होतें ? सुवर्ण ह्मणजे 'सावरिन' तर नाहीं ? 'सुवर्ण–सवर्ण–सावर्ण–सावरन–सावरिन' अशी Sovereign या इंग्रजी शब्दाची व्युत्पत्ति असणें अशक्य आहे काय ?

'आह्मांला अलंकार नकोत !' मातंगांपैकीं एकजण ह्मणाला. 'राजाला तुमचें जानवें दाखवलें ह्मणजे त्याला आमचें ह्मणणें खरें वाटेल.'

'तुह्मी दुसरें यज्ञोपवीत घेऊन राजाला द्या.' असें मीं ह्मटलें; परंतु त्या वेड्यांची समजूत होईना. ते तेंच जानवें मागूं लागले व हें नाहीं दिल्यास प्राण ध्यावा लागेल, अशी धमकी देऊं लागले. नारदा, प्राणापेक्षां काय अधिक प्रिय आहे ? यज्ञोपवीत ठेवून स्वतः मरण्यापेक्षां, तें देऊन व प्राण राखून धर्म केलेला बरा, असा पोक्त विचार करून मी तें यज्ञोपवीतहि दिलें, व राजा दिङ्नाग केव्हां मरण पावतो याची वाट पहात त्या अरण्यांतील दूरच्या एका गुहेंत तप करीत राहिलों !

इति श्रीपाराशरपुराणे राजकोपो नाम अष्टमोध्यायः समाप्तः ।

शुभं भवतु ॥

# अध्याय नववा.

## पुनःपल्लविता.

श्रीगणेशाय नमः । धौम्य ह्मणाले ' इकडे दिङ्नागराजानें नगरांत अशी वार्ता पसरविली, कीं, ऋषिशिष्य राजाला मारण्यास धांवले, तेव्हां राजरक्षकांनीं त्यांनां मारलें. धौम्यऋषीनें राजास अनुचित व उद्धट-पणाचीं उत्तरें दिल्यामुळें राजानें त्याला बंदिवासांत ठेवलें आहे, असें त्यानें नगरांत पसरविलें. कांहीं दिवसांनीं कारागृहांतून मी अरण्यांत पळून गेलों, अशी त्यानेंच बातमी उठविली व त्यानंतर मातंग परत आल्यावर 'धौम्यर्षींनां अरण्यांत वाघानें मारलें ' अशी वार्ता या नगरांत ज्याच्या त्याच्या तोंडीं झाली. ही वार्ता आश्रमांत लवकरच गेली.

आह्मी राजास अनुचित उत्तरें देणार नाहीं,अशी कुलपतींची आणि आश्रमांतील सर्व गुरूंची खात्री होती, व राजानें आमच्या औद्धत्या-संबंधानें वगैरे पसरलेली वार्ता खोटी आहे, असें त्यांनीं मनांत ओळखलें;परंतु कांहीं दिवसांनीं शिष्यांचीं तलवारीनें द्विधा केलेलीं शवें, त्यांचीं रक्तानें माखलेलीं वस्त्रें, चीवरप्राय झालेलीं माझीं वस्त्रें व विद्रूप केलेले शीर इत्यादि जेव्हां राजानें आश्रमांत पाठवून दिलीं, तेव्हां आमच्या मृत्यूची कोणाला शंका येणें शक्य नव्हतें. माझ्या पत्नीनें माझीं रक्तानें भरलेलीं वस्त्रें व माझें तें शीर जेव्हां पाहिलें, तेव्हां तिनें जो आकांत केला असेल, याची कल्पना केलेलीच बरी. हिरण्यगर्भराजा, पतिनिधनाचें दुःख शत्रुस्त्रियांनांसुद्धां होऊं नये, इतकें तें भयंकर आहे. ईश्वरानें हा दुर्धर प्रसंग कोमल अबलांवर कां आणावा, हें त्याचें त्यालाच ठाऊक ! एकादें आश्रमहरिण व्याघ्रमुखीं पडलेलें ऐकून जिचें दयार्द्र

अंतःकरण दुखित व्हावें, किंवा एकादी लता बैलानें तुडविली तर जिच्या जिवाला ती गोष्ट लागून रहावी, किंवा शिशिरऋतूंत शुष्कप्राय झालेली लता व वृक्ष पाहून जिचें मन विव्हल व्हावें व जिनें वल्लींनां व वृक्षांनां जलसेचन देण्याकरितां त्यापेक्षांहि कोमलतर व मधुरतर असलेल्या आपल्या शरीराला कष्ट द्यावेत व जिचें शरीर परिश्रमजन्य घर्मबिंदूंनीं पर्जन्यसिक्त लतांप्रमाणेंच भिजून जावें, त्या कोमल स्त्रीवर ईश्वरानें हा एवढा कठोर निर्घृण प्रसंग कां आणावा ? ईश्वर एवढा निष्ठुर आहे काय ? ईश्वराची ही 'लीला' ह्मणावी तर ईश्वराला इतकी घोर व अदय लीला कशी सुचते, याचें आश्चर्य वाटतें. नारदा, या गोष्टीचा विचारच न केलेला बरा !

कोणावरहि केवढाहि दुर्धर दुःखभार पडो. सर्वंसहा भूमीला कशाचा भार नाहीं, व सर्व गोष्टींकडे समदृष्टीनें पहाणाऱ्या सूर्यालाहि त्याचें कांहीं नाहीं. जगांत कोठे कांहींहि घडो, सृष्टीचा व सूर्याचा क्रम अबाधित चाललेलाच दिसेल. माझी पत्नी शोकसागरांत बुडाली ह्मणून दिनमणि उदयाचलावर येण्याचा राहील काय ? जड दिनमणीचें कशाला ? दिनमणितुल्य तपस्तेज असलेल्या कुलपतींचा व गुरूंचा नित्यक्रम या गोष्टीमुळें फारसा बाधित होईल काय ? माझी निधनवार्ता त्यांनां दुःखद झाली; पण धर्मकृत्यें सोडून याचा प्रतिकार होण्यासारखा नव्हता. तेव्हां ते समंजस व धर्मज्ञ मुनि निरर्थक शोक करीत बसले नाहींत. माझा प्रिय मित्र गभस्तिगतीसुद्धां दुःखित अंतःकरणानें पूर्ववत् नित्यनेम पाळूं लागला. तो तरी या ईश्वराधीन गोष्टीपुढें काय करणार ?

फार काय, नारदा, कांहीं दिनान्तरानें माझ्या पत्नीचा देखील शोक कांहीं अशांनीं शांत झाला. कुलपति एक दिवस तिच्या

समाचाराकरितां आले असतां त्या सुबुद्ध स्त्रीनें त्यांनां 'मीं आतां या आश्रमांत रहावयाचें का कसें ?' असें बोलतांबोलतां विचारलें. 'धौम्यर्षि जरी नसले, तरी हें उटज तुझेंच आहे,' असें कुलपतींनीं तिला सांगितलें व येथें राहण्यास अनमान करूं नये, असा प्रेमपूर्वक उपदेश केला. 'धौम्यर्षि गेले, पण त्यांचे पुत्रसम शिष्य येथें आहेत ना ?' कुलपति तिला ह्मणाले 'आणि हीं बालकें तुला 'आई' ह्मणतात. तूंहि इतके दिवस त्यांनां मातेप्रमाणें प्रेमानें वागविलेंस. या तुझ्या मानीव पुत्रांनां तुझा लळा लागला आहे; तर—''

'मलाहि हीं मुलें पुत्रांप्रमाणेंच वाटतात.' ती कोमलहृदया ह्मणाली. 'येथेंच राहून मुलांची शुश्रूषा करावी व धर्मग्रंथपठन करून पुण्य संपादन करावें, अशी माझी इच्छा आहे !'

तिचें हें वचन कुलपतींनां फार आवडलें. 'मी तुला हेंच सांगणार होतों,' असें ते ह्मणाले, व उचित उपदेश करून व तिचें सांत्वन करून आपल्या नित्य कार्याला लागले.

हिरण्यगर्भराजा, पुढची हकीकत मीं सांगूं नये असें वाटतें. पण कथा सांगण्याला आरंभ केला आहे, तेव्हां ती सांगतोंच. सावधान चित्तानें श्रवण कर व या कथेचें एकान्तांत जाऊन मनन कर.

इति श्रीपाराशरपुराणे पुनःपल्लविता नाम नवमोऽध्यायः समाप्तः ।

शुभं भवतु ॥

# अध्याय दहावा.

## पुनरुद्वाहोपदेश.

श्रीगणेशाय नमः । धौम्य ह्मणाले 'वरील प्रसंगाला दोन वर्षे होऊन गेलीं. माझ्या पत्नीचा शोकावेग एवढ्या अवधींत बराच शांत झाला, व तिचें प्रेपूमर्ण मधुर स्मित आश्रमबालकांनां पुनः आनंदित करूं लागलें. तिच्या चर्येवर शोकाची छाया होतीच; पण तिची मूळ लावण्यच्छाया कशी लुप्त होईल? शोकतमोवृत असली तरी ती शशिमुखी पौर्णिमेच्या रजनीप्रमाणें जनमनोहारिणी होती. हरिणानें कोमल पल्लव वगैरे खाऊन टाकल्यामुळें एकादी लता जशी विकलांग व शुष्कप्राय होते व नंतर पर्जन्यकालीं पुनः टवटवीत होते, तशी तिची अवस्था झाली; किंवा रजनी जशी उषःकालीं मधुर औदासीन्य व रम्य शांतता धारण करते, तसेंच, कांहीं दिवसांपूर्वीं शोकविव्हल झालेल्या माझ्या पत्नीचीहि मुखश्री या समयीं लोकांनां शांत व रम्य भासूं लागली.

गभस्तिगति एवढा इन्द्रियदमन करणारा; पण, नारदा, तोहि अखेर विकारवश झालाच. माझ्याकरितां त्यानें पूर्वीं प्रेमत्याग कसा केला, हें मीं सांगितलेंच. त्याचा केवढा तो दिव्य स्वार्थत्याग ! केवढा त्याचा तो इन्द्रियनिग्रह ! त्याची ती पापभीरुता व त्याचा तो विद्याव्यासंग या समयीं कोठें गेला होता कोणास ठाऊक; पण त्याचें मन या काळीं विकारवश झालें. तो धर्मज्ञ होता, नियतेंद्रिय होता; पण ही विवाहकल्पना त्याच्या मनांतून कांहीं केल्या जाईना. त्यानें मन आवरण्याला पुष्कळ प्रयत्न केला, पण वसिष्ठादि वृद्ध महर्षींनांसुद्धां आपलें मन आवरतां आलें नाहीं, हें पाहिलें, ह्मणजे गभस्तिगतीला या कामीं

यश आलें नाहीं असें झाल्यास नवल काय? नारदा, दैवघटना फार विलक्षण आहे, असें ह्मण किंवा 'काम' हा अनिवार्य रिपु आहे असें ह्मण; गभस्तिगति कामवश झाला ही गोष्ट खरी!

नारदा, यापुढें गोष्ट सांगणें कठीण. मी आतां वृद्ध आलों आहें; परंतु आपल्याच मुखानें आपल्या पत्नीच्या—ती आतां माझी पत्नी कोठली? तिचें मन दुसऱ्यानें हरण करून घेतलें! ती मुग्ध आश्रम-हरिणीप्रमाणें मदनवश झाली. गभस्तिगति धर्मवेत्ता व तीहि धर्मज्ञ; परंतु त्यांचा या कामीं उपाय चालेना. विवाहकल्पना मनांतून जावी ह्मणून तीं एकमेकांचें दर्शन घेईनाशीं झालीं; परंतु हृदयांत भरलेल्या प्रियमूर्तीला तीं कशीं घालवूं देऊं शकणार? प्रत्यक्ष दर्शन नसलें तरी प्रियमूर्ति मनःचक्षूंपुढें आल्याशिवाय कशी राहील?

गभस्तिगतीनें चित्त शांत व एकाग्र करण्याचे अनेक प्रयत्न केले, परंतु यामुळें त्याचा कामाग्नि अधिकच प्रबल होई, व तिच्या स्मृतिरूप मूर्तीकडेच त्याचें एकाग्र चित्त लागे! माझ्या पत्नीनेंहि—नव्हे सुलोचनेनेंहि—आपल्याकडून इंन्द्रियदमन व मनोनिग्रह करण्याचा प्रयत्न केला. परंतु गभस्तिगतीचें तेजस्वी व मोहक मुख तिच्या डोळ्यांपुढून जाईना व माझेंहि मुख तिच्या डोळ्यांसमोरून हालेना! माझ्याशीं विवाह करण्यापूर्वीं गभस्तिगति का मी, याविषयीं तिचें मन जसें संशयदोलारूढ होऊन गेलें होतें, त्यापेक्षां तिचें मन आतां अधिकच व्याकुल झालें! निशास्तसमयीं संध्येला एकीकडे अस्तंगत चंद्राची जशी पुसट आठवण रहावी व दुसरीकडे उदयाचलीं येऊं पाहणाऱ्या सूर्याचें मधुरतेजोयुत मुख तिच्या दृष्टीस पडूं लागावें, तशी तिच्या मनाची स्थिति झाली!

मनोनियमन करण्याच्या हेतूनें गभस्तिगति अध्यापनांत अधिक काल घालवूं लागला, व ग्रंथपठनादि उद्योग काढून सुलोचनेचा विचार

मनांत येण्यास अवकाशच द्यावयाचा नाहीं, असा त्यानें निश्चय केला. पण अध्यापन करतांना, अध्ययन करीत असतां, बोलतांचालतां, खातांपितां, जलीं, काष्ठीं, पाषाणीं सगळीकडेच व सर्व कालीं तिची मूर्ति त्याच्या डोळ्यांपुढें येऊं लागली, तेव्हां त्याला काय करावें हें सुचेना. स्त्रीनें पतिनिधनानंतर विवाह करण्यास शास्त्राचा प्रत्यवाय नाहीं, हें त्याला ठाऊक होतें, व आपण सुलोचनेशीं विवाह केल्यास हें पाप होईल, असें त्यास वाटत नव्हतें. पण असा विवाह होऊं नये, असेंहि त्याला एक प्रकारें वाटत होतें. त्यामुळें या प्रसंगीं 'धर्म काय व अधर्म काय ' याविषयीं त्याचें मन साशंक झालें, व त्यानें ही गोष्ट कुलपतींनां कळवून निर्णय करणें त्यांच्यावरच सोंपविण्याचा निश्चय केला.

परंतु त्यापूर्वींच सुलोचना कुलपतींकडे गेली होती. त्यांनां तिनें आपली शोचनीय अवस्था सांगितली व ' प्राणत्याग करण्याचा माझा विचार आहे ' असें ह्मटलें.

' प्राणत्याग करणें हा धर्म नव्हे.' कुलपति ह्मणाले. 'वासना मेली पाहिजे; शरीर मरून काय उपयोग ? ' असें त्यांनीं सांगितलें.

' जिवंत आहें तोंपर्यंत वासना मरावयाची नाहीं, तेव्हां मेलेलेंच बरें. ' ती ह्मणाली.

'सुलोचने,' कुलपति ह्मणाले 'तुझ्या मनांत विवाहाची वासना आहे ती मरून जावयाची नाहीं. तुला या पायीं पुनः स्त्रीदेहांत पुनर्जन्म घ्यावा लागेल. तुला खरें वैराग्य पाहिजे असेल, व आत्मप्राप्तीची खरी इच्छा असेल तर मनाचेंच नियमन कर. '

' पण हें शक्य नसलें तर ? ' तिनें विचारलें.

' हें शक्य नसेल, तर तूं पुनः विवाह कर. सुलोचने, आपल्या शास्त्रांत स्त्रियांनां पुनः विवाह करण्यास अनुज्ञा आहे. आपलें शास्त्र इतकें कठोर नाहीं. मनांत अहोरात्र पापविचार व पापवासना जर दुर्निवार रीतीनें येत असतील तर केवळ शरीरास कैद करून काय पुण्यलाभ होणार आहे ? शिवाय सुलोचने, तुझ्या मनांत जी विवाहेच्छा आहे, ती मला विशेष पापात्मक वाटतच नाहीं. ज्या वेळेस तूं लग्न केलेंस त्या वेळींहि तुझें या गभस्तिगतीवरच अधिक प्रेम होतें; पण त्या वेळीं तूं आपलें खरें सात्त्विक प्रेम कोणावर आहे हें न ओळखून राजस प्रेमाला बळी पडलीस. जरत्कारुगुरूंचाहि कल धौम्यर्षींकडेच होता, ह्मणून तुझ्या राजस प्रेमाला जोर करण्यास अवसर मिळाला. अस्तु. गभस्तिगतीचीहि तुझ्यासारखीच अवस्था झाली आहे. तुमचा स्वभाव अनुरूप आहे. तुह्मी दोघेंजणें धर्मशील व सुविनीत आहांत. तुमचें मन परस्परांच्या सद्गुणांनींच आकर्षण करून घेतलेलें आहे. तुमच्या प्रेमांत मला तामस अंश मुळींच दिसत नाहीं. मनें प्रेमबद्ध असतां, शरीरें अलग ठेवण्यांत तरी काय अर्थ आहे ? तर सुलोचने, माझें ऐकावयाचें असेल तर तूं गभस्तिगतीशीं विवाह कर, व योग्यकालीं वैराग्य प्राप्त झाल्यावर तुह्मी दोघेंजणें वानप्रस्थाश्रम घ्या, आणि मग तप करून ब्रह्मपदप्राप्ति करून घ्या, ह्मणजे तुह्मां दोघांनां पुनर्जन्म घेण्याची पाळी येणार नाहीं. वासना कायम असतां, लोकलज्जेस्तव तूं जर देहावसान करून घेशील तर त्यांत विशेष कांहीं लाभ आहे, असें मला वाटत नाहीं.'

पुढची हकीकत थोडक्यांतच आटपतों. पौर्णिमेचा चंद्र कालवश झाल्यावर प्रातःसंध्या जशी उदयमान सूर्याच्या स्वाधीन होते, तशी

सुलोचना लवकरच गभस्तिगतीची धर्मपत्नी झाली व त्याच्या संगतींत शांत व सात्त्विक सुखोपभोग घेत कालक्रमणा करूं लागली.

इति श्रीपाराशरपुराणे पुनरुद्वाहोपदेशो नाम दशमोऽध्यायः समाप्तः ।
शुभं भवतु ॥

# अध्याय अकरावा.

## दैवयोग.

श्रीगणेशाय नमः । धौम्यमुनींनीं दीर्घ श्वास टाकून पुनः ह्मटलें 'हिरण्यगर्भराजा, या गोष्टीला सातआठ वर्षे होऊन गेलीं. मध्यन्तरींची हकीकत पाल्हाळपणें मी सांगत नाहीं. कारण त्यांत सांगण्यासारखें विशेष कांहीं नाहीं. अरण्यांतील गुहेंत माझी तपश्चर्या चालू होती. इकडे आश्रमांत काय गोष्टी झाल्या आहेत याची मला कल्पनाहि नव्हती. ' दिङ्नागराजा मरण पावल्याशिवाय मी जिवंत असल्याची वार्ता कोणास कळूं देणार नाहीं' असें मातंगांनां दिलेलें वचन मीं अक्षरक्षः पाळलें. त्या दुष्ट राजाच्या मरणघटकेची मी वाट पहात होतों. अखेर करतांकरतां आठ वर्षांनंतर तो राजा मृत्यु पावल्याची मला वार्ता समजली. लगेच मीं ती गुहा व ती तपश्चर्या सोडली, व १५ दिवसांच्या आंत आश्रमाजवळ आलों. आश्रमाच्या आसपासचे डोंगर, तेथील वृक्ष, तेथील विहीर, फार काय, तेथील डबकींसुद्धां पाहून मला अवर्णनीय आनंद झाला. पण मी प्रिय पत्नीच्या व प्रिय मित्राच्या दर्शनास अत्युत्सुक झालों असल्यामुळें वरील गोष्टींकडे मीं विशेष लक्ष्य दिलें नाहीं. अखेर संध्याकाळच्या सुमारास माझें उटज व मीं लावलेले अगस्त्याचे, बकुळीचे वगैरे वृक्ष दिसूं लागले. हे जड वृक्ष पाहून देखील मला किती आनंद झाला, याचें नारदा, मी वर्णन करीत नाहीं. कारण नारदा, हा आनंद फार वेळ टिकला नाहीं. मी आपल्या उटजा-जवळ जातों तों एक तीनचार वर्षांची मुलगी उटजाबाहेरील अल्पशा पुष्पोद्यानांत खेळत आहे, असें मीं पाहिलें. मला येतांना पाहून चकित

हरिणीप्रमाणें ती माझ्याकडे पहात उभी राहिली. पुष्पोद्यानाचें द्वार उघडण्यास तिला मीं सांगितलें. पण ती घाबरून गेलेली दिसली. ती आपल्या जागेवरच स्वस्थ उभी राहिली. तिच्या मुखाकडे पाहून मला सुलोचनेच्या बालपणाची आठवण झाली व 'तिची तर ही मुलगी नसेल ना ?' अशी शंका आली. ही कल्पना आल्याबरोबर माझें धैर्य खचलें, व पाय गळले. सर्व अंगाला घाम सुटला. घाबरतघाबरत मीं त्या मुलीला ह्मटलें 'मुली, घाबरूं नकोस, तुझें नांव काय ? तूं कोणाची मुलगी ?'

'आईची' ह्मणून तिनें उत्तर दिलें. 'आईची' या उत्तरानें मला त्या स्थितींतहि जरा हंसूं आलें. पुनः मीं तिला ह्मटलें 'मुली, तूं आईची खरी; पण तुझ्या आईचें नांव ?'

'आईचं नांव, आई.' ती ह्मणाली. या उत्तरानें मला अधिकच हंसूं आलें; पण तें क्षणिकच होतें. तिच्या मुखाकडे निरखून पाहतां तिची आई कोण असावी, याची मला चांगली कल्पना आली. कदाचित् दुसऱ्या कोणाची ती मुलगी असेल, अशी आशाजनक कल्पनाहि आली. इतक्यांत त्या उटजाजवळून एक लहानसा मुलगा जात आहे असें पाहून मीं त्याला विचारलें 'बाळा, हें उटज कोणाचें व येथें कोण रहातो ?'

'आमचे गुरु गभस्तिगति व त्यांची पत्नी सुलोचनामाता येथें राहतात,' असें तो ह्मणाला. हे शब्द मीं ऐकले असतीलनसतील तोंच माझी पत्नी—माझी नव्हे, गभस्तिगतीची पत्नी—दीड दोन वर्षांच्या एका लहान मुलाला कडेवर घेऊन देहलीवरील दीप लावण्याकरितां आली. तिला तसें पाहिलें मात्र; मला वेड लागल्यासारखें होऊन मी तेथून जो धांवूं लागलों तो कुलपतींच्या आश्रमापाशीं गेलों.

त्यांचें दर्शन झाल्याबरोबर मीं त्यांचे चरण धरले. त्यांनीं मला पाहिल्यावर 'बरा आलास; मी तुझीच वाट पहात होतों,' असें ह्मटलें. यावर काय बोलावें हें मला सुचलें नाहीं.

'धौम्य,' ते पुनः मला ह्मणाले 'तुह्मीं आपल्या उटजापाशीं जो प्रकार पाहिलात त्याचें तुह्माला आश्चर्य वाटलें असेल व तुह्माला रागहि आला असेल.'

मी कांहींच बोललों नाहीं. त्यांचे 'तुह्माला' हे बहुमानदर्शक शब्द मला कांहीं बरे वाटले नाहींत.

'बाल धौम्य,' ते ह्मणाले 'तूं विवाह केलास तो आपल्या सुखासाठीं का तिच्या सुखासाठीं ?'

'बाल धौम्य' हें एकेरी संबोधन मला किती तरी सुखदायक झालें! पण त्यांनां उत्तरादाखल मी कांहीं बोललों नाहीं. मी पत्नीवर व कुलपतींवरहि इतका संतप्त झालों होतों कीं, त्या स्थितींत कांहीं बोलणेंच शक्य नव्हतें. त्या स्थितींत मी काय बोलणार ?

'धौम्य, शांत हो.' ते सौम्यतेनें ह्मणाले. 'तूं अरण्यांत राहून आठ वर्षे तपश्चर्या केलीस, तरी विषयसुखाची तुला इच्छा आहेच ना? विषय-सुखांत सुख आहे, असें तुला अद्यापि वाटतें काय ?'

'नाहीं. पण माझी पत्नी—'

'तिनें पुनः विवाह केला, याच्यांत तिचा दोष नाहीं. मींच तिला ही गोष्ट करण्यास सांगितलें.'

'आपण या गोष्टीला कशी अनुमति दिलीत ?'

'धौम्य, तुला मी सर्व सांगतों. शांतपणें विचार कर. सुलोचना ही सच्छील खरी; परंतु तिचें गभस्तिगतीवर लहानपणापासून प्रेम

होतें, व राजस प्रेमानें अंध होऊन व पितामहाची इच्छा ही 'आज्ञा' मानून तुझ्याशीं विवाह केल्यानंतर हें प्रेम सुप्त झालें. तुझ्या निधनाची वार्ता ऐकल्यानंतरहि तिनें विवेक करून हें प्रेम कांहीं काळ सुप्त ठेवलें. पण, धौम्य, कांहीं वर्षांनंतर यौवनानें व या प्रेमानें फार उचल केली. मनोनियमन करण्यासाठीं तिनें हरप्रयत्न करून पाहिले. परंतु गभस्तिगतीची मूर्ति तिला जळीं, काष्ठीं, पाषाणीं जेव्हां दिसूं लागली, व तिचा निद्राभंग होऊन नित्य धर्माचरणाकडेहि तिचें जेव्हां लक्ष्य लागेनासें झालें, तेव्हां मनोनिग्रह करणें अशक्य वाटून तिनें प्राणत्याग करण्याचें योजिलें. मला ही गोष्ट कळल्यावर मीं तिचें निवारण केलें व प्राणत्याग करण्यापेक्षां त्याच्याशीं विवाहच केलेला बरा, असा तिला उपदेश केला. धौम्य, वासना जिवंत असतां, केवळ देहनाश केल्यानें आत्मशुद्धि होत नाहीं, हें तूं जाणत आहेस. तिची आत्मशुद्धि तुला जर प्रिय असेल, तर तिला तूं दोष देऊ नये. तुझ्याशीं एकदां तिनें विवाह केला, ह्मणून तिनें आपला देहनाशच नव्हे तर आत्मनाशहि करून घ्यावा काय ?'

'पण अन्य पति केल्यानें आत्मनाश होत नाहीं का ?' मीं जरा रागानें ह्मटलें.

'नाहीं.' ते आवेशाने म्हणाले. 'या सर्व गोष्टी सारासारविचारानें पाहिल्या पाहिजेत. धौम्य, तुझें मातापित्यांवर प्रेम होतें कीं नाहीं ? जर होतें तर मग ते निधन पावल्यावरहि तूं आपल्या पत्नीसमवेत सुखोपभोग कां घेत होतास ? मातापिता मरण पावले ह्मणून सर्व–सुखसंन्यास तूं कां केला नाहींस ? मी तुला दोष देत नाहीं; पण माझें तुला एवढेंच सांगणें आहे कीं, मानवमात्राची सुखप्रवृत्ति कांहीं काळ दुर्निवार आहे.

प्रेमाचें एक माणूस निधन पावलें, ह्मणून सर्वदा दुःखी रहाण्यास एकाद्याला सांगणें असमंजसपणाचें आहे. आपल्या मागें राहिलेल्या माणसांनीं आपल्याकरितां जन्मभर दुःखी रहावें, अशी त्या मृत माणसाचीसुद्धां इच्छा नसते. मरतांना मातेला असें का वाटत असतें कीं, आपल्या मुलांनीं आपल्याकरितां आजन्म शोक करीत रहावें ? मरतांना पत्नीला असें का वाटत असतें कीं, आपल्या पतीनें सर्व जन्म आपल्याविषयीं शोक करण्यांत घालवावा ? मग पतीनें तरी अशी इच्छा कां धरावी ? पत्नीला सुख व्हावें, तिची आत्मोन्नति व्हावी, अशी जर पतीची इच्छा असेल, तर आपण मरण पावल्यावरहि आपल्या अल्पवयस्क पत्नीनें त्या वयांतच सर्वसंगपरित्याग करावा, असें दयार्द्र अंतःकरणाच्या विवेकी पतीस तरी वाटूं नये.'

'पुनः विवाह केल्यानें तिला सुखप्राप्ति होईल; पण तिची आत्मोन्नति होईल असें मला वाटत नाहीं.' मीं ह्मटलें.

'आत्मोन्नतीहि होईल.' ते आवेशानें ह्मणाले. 'अन्य पति केल्यानें पातिव्रत्यभंगाचा दोष येतो हें मला ठाऊक आहे; पण कित्येक अबलांचें मन त्यांच्या स्वाधीन नसतें. त्यांनीं किती केलें तरी प्रबल व गीतेंत म्हटल्याप्रमाणें 'प्रमाथि' असलेलीं इंन्द्रियें त्यांचें मन विकारवश करतात. विवेकानें त्या आपल्या कृतीचें नियमन करूं शकतात; पण मनाचें नियमन करणें अत्यंत दुर्घट. या कर्मानें शुद्ध राहूं शकतात; पण मनांत त्यांनां विवाहेच्छा होतेच. जन्मभर त्यांचें शरीर शुद्ध, पण मन पापी असतें. मनाची पापवासनेकडे ओढ अनावर वाहूं लागली ह्मणजे खुशाल पापें करावींत, असें मी ह्मणत नाहीं; आणि कोण ह्मणेल ? पण 'पाप' कोणतें व कोणतें नाहीं, हें पाहिलें पाहिजे. पुनर्विवाह हा नित्य पापात्मक आहे, तो कधींहि क्षम्य नाहीं, आपद्धर्म

ह्मणून सुद्धां तो समाजांत येऊं देण्यासारखा नाहीं, असें तुला वाटतें काय? धौम्या, बाह्य शरीरशुद्धि अधिक का खरी अंतःशुद्धि?'

'अन्य पति केल्यानें अंतःशुद्धि होते, असें का आपलें ह्मणणें?' मीं जरा उपसेधिक स्वरानें ह्मटलें.

'होय' ते ह्मणाले. 'खरें वैराग्य प्राप्त होऊन सर्व जगताकडे समतेनें व प्रेमदृष्टीनें पाहणें याचेंच नांव आत्मोन्नति. मनांत अहर्निश सुखोपभोगाचे विचार चालले असून देहदृष्टया स्वीकारलेलें वैराग्य खरें वैराग्य नव्हे. सर्व विश्व ज्याला कुटुंबाप्रमाणें वाटूं लागेल, व सर्व भूतांच्या ठायीं समदृष्टीनें व प्रेमदृष्टीनें जो पाहूं शकेल, त्याचेंच खरें वैराग्य. ही स्थिति प्राप्त होण्याचे अनेक मार्ग आहेत. विवाह वगैरे न करतां संन्यस्तवृत्तीनें राहणें, हा एक मार्ग आहे. पण हा मार्ग फार कठीण आहे. हा कंटकमय व मोहगर्ता–मय आहे. या मार्गानें जाऊन यशःप्राप्ति करून घेणारे साधु किंवा साध्वी धन्य होत, यांत शंका नाहीं. पण याशिवाय सुसाध्य एक मार्ग आहे. ज्याच्या सद्गुणांवर आपलें सात्त्विक प्रेम जडलें आहे, ज्याच्या समागमांत आपणांस पवित्र विचार सुचतात, ज्याचें उदार अंतःकरण आपणांसहि उदार होण्यास प्रेमानें शिकवितें, ज्याची निःस्वार्थ परहितबुद्धि आपल्या स्वार्थ-बुद्धीस लाजविते, ज्याचें ज्ञान आपलें अज्ञानपटल दूर करतें, ज्याची धर्मप्रवृत्ति आपल्या उच्छृंखल मनास आवरून धरण्यास सांगते, अशा प्रेमपूर्ण सात्त्विक पुरुषाशीं विवाह करण्याचें एकाद्या कोमल स्वभावाच्या अज्ञान अबलेनें मनांत आणलें, तर तिला पापिणी ह्मणण्यास मी तयार नाहीं.'

'तात्त्विकदृष्टया मला वाद करावयाचा नाहीं.' मीं शांत होऊन ह्मटलें. 'आपण ह्मणतां हें सर्व खरें असेल; पण मी जिवंत असतांना आपण या गोष्टीला अनुज्ञा दिली, याचें मला आश्चर्य वाटतें.'

'याचें कारण तुला योग्य कालीं समजेलच. धौम्य, ईश्वरी नेमानेम फार विलक्षण आहेत. मनुष्य मात्र 'माझें' धन, 'माझी' भार्या, इत्यादि गोष्टींचा वृथाभिमान बाळगून स्वतःस उगीच दुःखी करून घेत असतो. मनुष्य आज आहे नि उद्यां नाहीं. 'माझे गृह,' 'माझी पत्नी,' असें ह्मणण्यांत अर्थ काय? सुलोचना ही तुझ्या सुखाकरितां का ईश्वरानें निर्माण केली आहे? तिच्या आत्म्याला स्वतंत्र अस्तित्व नाहीं का? धौम्य, पूर्वीं गभस्तिगतीनें तुझ्याकरितां सुलोचनेचा नाद सोडून दिला. त्यानें हा प्रमत्याग त्या तरुण वयांत केला. १ आतां तपश्चर्या केली आहेस. या वयांत तूं सुलोचनेवरचा अधिकार सोडण्यास तयार झाला नाहींस, तर तुझे मन अनुदार व क्षुद्र आहे, असें मी ह्मणेन. सुलोचनेला तूं जर आतां दुःख दिलेंस तर सुलोचनेवरील तुझी प्रीति सात्त्विक नव्हती, ती स्वसुखार्थ होती, असेंच मी ह्मणेन. 'न वाऽऽरे जायायाः कामाय जाया प्रिया भवति। आत्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति।' हें उपनिषदांतील वाक्यच अखेर खरें ह्मणावयाचें ना? धौम्य, तूं सुद्धां या वाक्याला अपवादभूत होत नाहींस ना? जगांत उच्च व निरपेक्ष प्रेम मुळींच नाहीं, असेंच ना ह्मणावयाचें?'

'गुरुजी, मी सुलोचनेला दर्शन देऊन तिला दुःख देणार नाहीं व गभस्तिगतीच्याहि सुखांत मी माती कालवूं इच्छीत नाहीं. त्या दोघांनीं सुखांत नांदावें हीच माझी इच्छा आहे. क्षुद्र अहंकार मीं आजपासून सोडला. जगांत अहेतुक उच्च सात्त्विक प्रेम आहे, हें मी आज सिद्ध

करून दाखविणार. आपल्या उदात्त उपदेशास व उदार उदाहरणास अनुरूप असेंच मी चरित्र ठेवीन. परंतु गुरुजी, आपणांस मी जीवंत आहें, हें अंतर्ज्ञानानें कळलें असून आपण या गोष्टीस कशी अनुमति दिलीत, याचें मला गूढ पडलें आहे. ही शंकानिवृत्ति झाली ह्मणजे मी येथून या पावलींच निघून जातों व पूर्वींच्या गुहेंतच तपश्चर्या करीत राहतों.'

'धौम्य, माझे हेतु तुला योग्य कालीं कळतीलच. तुझा निश्चय पाहून मला संतोष होत आहे. तुझ्यासारखे सच्छिष्य पाहून कोणाला समाधान होणार नाहीं? धौम्य, सुलोचना ही देखील आतां पूर्ण विरक्त झालेली आहे. गभस्तिगतीनें व तिनें आज एक वर्ष असिधाराव्रत पाळलें आहे, व तीं दोघेंजणें आतां लवकरच [illegible] प्रवेश करणार आहेत. तुझ्यापेक्षांहि तिची विरक्ति अधिक—'

त्यांनीं तें वाक्य पुरें करण्यापूर्वींच एक मोठा आर्तरव आमच्या कानीं पडला. 'काय असावें' असा आह्मी तर्क करूं लागलों. अनेक छात्रांचा शोकरव आतां ऐकूं आला. कुलपति आसनावरून उठले व उटजाबाहेर जाऊं लागले, इतक्यांत त्यांचा एक बालशिष्य तेथें घाइघाईनें धांवत आला व घाबऱ्याघाबऱ्या व शोकाकुल स्वरानें त्यांनां ह्मणाला 'गुरुजी, गभस्तिगतिगुरूंनां व सुलोचनामातेला सर्पदंश होऊन त्या तात्काळ मरण पावल्या आहेत. त्यांची कन्या व त्यांचा पुत्र रडत आहेत. तीं दोघेंजणें धाडकन् पडलेलीं ऐकून आह्मी तेथें गेलों व नागाला मारलें; पण इतक्या अवधींत तीं दोघेंजणें विगतप्राण झालीं.'

हिरण्यगर्भराजा, पुढची कथा आतां मी सांगत नाहीं. स्त्रीनें विवाह पुनः करावा किंवा नाहीं, याविषयीं तुह्मीं मला विचारलेंत ह्मणून

मीं आपली कथा तुह्मांला सांगितली. या गोष्टीस किती तरी वर्षें होऊन गेलीं आहेत! हिरण्यगर्भराजा, माझ्या मनाचा तपश्चर्येनें मीं आतां निग्रह केला आहे व सुलोचनेवरील माझा कोप पूर्णपणें शांत झाला आहे. तिनें केलें त्याच्यांत कांहीं निंद्य आहे, असें मला वाटत नाहीं. कुलपतींनींहि या गोष्टीस कशी अनुज्ञा दिली, याचेंहि मला आतां आश्चर्य वाटत नाहीं. तिचा मरणकाल त्यांनां अंतर्ज्ञानानें कळला असल्यामुळें मरणापूर्वीं तिची जेवढी आत्मशुद्धि व आत्मोन्नति होईल तेवढी त्यांनीं तिला करूं दिली. तिचें जर गभस्तिगतीवर मूळचें व सात्त्विक प्रेम नसतें, तर त्यांनीं तिला अनुज्ञा दिली नसती; आणि 'ही अनुज्ञासुद्धां मीं निरुपायास्तव दिली,' असें ते मला मागाहून ह्मणाले. प्राणत्यागाशिवाय तिचा प्रेमनिग्रह होणें शक्य नाहीं असें पाहिल्यावरच त्यांनीं तिला अनुमति दिली. असो. तिनें केलें तें त्या परिस्थितींत योग्यच होतें, असें मीसुद्धां आतां ह्मणतों; पण, नारदा, तूं अंतर्ज्ञानी आहेस. माझा अभिमान अद्यापि पूर्ण लुप्त झाला नाहीं, हें तुझ्याशीं मला कबूल केलें पाहिजे. सुलोचना जर अखेरपर्यंत माझीच रहाती, तर किती चांगलें झालें असतें? पण या गोष्टी मानवशक्तीच्या बाहेर आहेत. जें झालें तें ईश्वरी नेमानेमाप्रमाणेंच झालें व त्यांत गर्हणीय असें कांहीं नव्हतें, एवढी माझी श्रद्धा आहे. यापेक्षां मी तरी अधिक काय बोलणार?

इति श्रीपाराशरपुराणे दैवयोगो नाम एकादशोध्यायः समाप्तः ।

शुभंभवतु ॥

